## अविचारी प्रेम-विवाह ४

"नले, काय ग उद्याच्या वादविवादाचा विषय ठरला!" लेडीज रूममध्ये शिरतांना कुसुमने नलिनीचा पदर ओढून विचारलें.

"ती एक हकीगतच आहे मेली." नलिनीने त्रासूनच उत्तर दिलें. पुस्तक टेबलावर आदळून ती खुर्चीवर बसली.

"अजून नाहीच का ठरलं कांही?"

"नाही."

"म्हणजे! उद्याच वादविवाद ना!"

"होय. पण–"

"पण काय? सांग ना."

"त्या तारालाच विचार काय तें."

"तिला? कमिटीमधल्या गुप्त गोष्टीविषयी प्रश्नच का विचारलास म्हणून माझ्याशीं हुज्जत घालत बसेल आधी."

"अन् आज तरी दुसरं काय केलं? तिच्या वादामुळंच विषय नक्की ठरेना. सकाळीं ८ पासून 'आम्ही जमलों. शेवटीं

कॉलेजची वेळ झाली तशी मी आलें बाई निघून. . ती बसली होती तशीच."

"म्हणूनच पहिल्या तासाला आली नव्हती! पण वाद तरी कसला घातलान्?"

"कांही नाही. मी सुचवलं की 'हिंदुस्थानानं लीग आफ नेशनचें सभासद होणें हा एक फार्स आहे' हा विषय वादविवादाला घ्यावा. हिच्याजवळ मी याबद्दल आधी बोललेंही. ती म्हणाली, नुसना फार्स म्हणूं नकोस, मोठा फार्स म्हण. मी म्हटलं. 'फार्स' काय नी 'मोठा फार्स' काय एकच. तर माझ्याशीं भांडली--"

"बरं मग?"

"मी नाही घातला तो शब्द. जसाचा तसा मी ठराव मांडला. त्यावर ते प्रधान आहेत ना ते सहज म्हणाले, पाठीमागे 'मोठा' शब्द घालावा. ही जी उठली ती 'मोठा' शब्दाची जरुरी नाही म्हणून भांडत सुटली. काय वाटलं असेल मला! हिचीं प्रामाणिक मतं काय—?"

"चूप ती पहा ताराच आली. इथं नको बाई आणखी." दोघीहि पुस्तकं उचलून पुढच्या तासाला जायला तयार झाल्या.

"काय ग नले तुझा हा फाजीलपणा?" आंत शिरत बऱ्याच त्रासिकपणं तारा म्हणाली.

"कां? काय झालं?" नलिनीच्या कपाळावर किंचित आठी चढली.

"छान. पुन्हा आणखी विचारतेस कां? ठरावाचा निकाल लागण्यापूर्वी निघून गेलीस मला एकटीला ठेवून."

"अं, तुझ्या हातीं माझा ठराव असल्यामुळे मी अगदी निर्धास्त होतें." वाद मिटवण्याकरतां नलिनी बोलली. ताराला ती स्वतःची स्तुति वाटली. तिच्या रागाचा पारा उतरला.

"अं, तसं ते प्रधान गारच झाले म्हणा शेवटीं. अखेरीस नुसता 'फार्स' शब्दच ठेवायचं ठरलं."

"पण त्यांनी आनंदानं कबूल केलं का तें?" किंचित् हसून कुसुम मधेच बोलली.

"अं, मला त्याची बिलकुल फिकीर नाही; परंतु त्यांना आपली उपसूचना मागे घेणं भाग पडलं."

"त्यांना उपसूचना मागे घेणं भाग पडलं? आणि याला तूं आपला विजय समजतेस?"

"कां नाही?" तारेच्या स्वरांत जरा जोर आला. ती कुसुमकडे पाहूं लागली.

"चल बाई, मधली सुट्टी संपत आली. आज इंग्लिशला ते नवे प्रोफेसर येणार म्हणे?" वादाला कंटाळलेली नलिनी हातावरील घड्याळाकडे पहात म्हणाली.

"प्रोफेसर? प्रोफेसर नाही लेक्चरर." तारेने उगीचच पण चटकन् नलिनीची चूक सुधारली.

"लेक्चरर म्हण नाहीतर आणखी कांही म्हण. पण एल्फिन्स्टनचे ते फेलो होते. सर्व परीक्षांत पहिला वर्ग सोडला नाही त्यांनी, अन् ते बोलतातही चांगले. उद्याच्या वादविवादामधे सांगूं या त्यांना बोलायला. काय ग तारे?" कुसुम ताराकडे वळून म्हणाली.

"अं, पाहूं." अस्खलित व धीटपणानं बोलणारी म्हणून कॉलेज डिबेटमधे तारेची ख्याति होत चालली होती. या ख्यातीची जाणीव तिच्या नकळत तिच्या वागणुकींत दिसूं लागली होती.

"पाहूं काय? विचारूंच त्यांना. आपली बाजू झेवियरविरुद्ध तितकीच मजबूत नाही का होणार?"

कांही तरी उत्तर देण्याकरतां तारा पुढे झाली तोंच कुसुम पुस्तकें घेऊन एकदम चालूं लागली. नलिनीकडे वळून ती बोलणार तों सुट्टी संपल्याची घंटा झाली. दोघींनी पुस्तकें उचललीं. दोघीही देवधरांच्या वर्गाकडे घाईने गेल्या—उत्सुकतेने गेल्या. उत्तम लेक्चर ऐकायला मिळेल म्हणून नलिनीची उत्सुकता होती. देवधर कांही तितकेसे चांगले वक्ते नाहीत असें कुणीकडून तरी ऐकायला मिळेल म्हणून तारेची उत्सुकता—!

—२—

या जगांत प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टींत नेहमी पहिली वेळच महत्त्वाची असते, हा अनुभव कोणाला नाही? मग देवधरांचें पहिलें लेक्चर या गोष्टीला अपवाद कसें ठरणार? लेक्चरला सुरवात होण्यापूर्वी जो तो निरनिराळ्या दृष्टीने त्यांच्याकडे बघत होता. त्यांच्या तासाला स्टँपिंग करायला मिळेल की नाही म्हणून बरेच विद्यार्थी टपून बसले होते. पूर्वीचे प्रोफेसर नुसत्या नोट्स उतरवण्यांतच हुशार होते, म्हणून हुशार व ज्ञानेच्छु असे थोडे विद्यार्थी जरा आशेने बसले होते. बऱ्याच विद्यार्थिनी खाली बघत होत्या—

"नाक चांगलं आहे नाही ग यांचं?"

नलिनी कुसुमला हळूच चटकन म्हणाली.

धीट तारेने एकदा वर बघितलें. नंतर ती दुसरीकडेच बघत होती. देवधर उंच होते. शरीराने जरा कृशच होते. त्यांच्या नाकाची ठेवण खरोखरीच सुंदर होती. पण त्यांच्या डोळ्यांत मात्र कसली तरी उदास छटा दिसे. लेक्चरला सुरवात झाली. पुस्तक मिल्टनचें 'पॅरॅडाइज लॉस्ट' हें काव्य होतें. कांही भाग पूर्वी शिकवून झालाच होता. त्याच्यापुढे देवधर शिकवूं लागले. प्रथम

प्रथम त्यांचा स्वर अगदी खालचा होता. ते ओळी वाचीत, त्यांचा थोडक्यांत अर्थ समजावून सांगत. मधेच एखाद्या शब्दाची व्युत्पत्ति समजावून देत आणि पुढे जात. पण थोडयाच वेळाने "स्वर्गांत गुलामगिरींत राहण्यापेक्षा नरकांत राज्य केलेलं चांगलं" हें सैतानाचें वाक्य आलें. त्याबरोबर त्यांचा आवाज चढला. सैतानाचा स्वभाव ते अस्खलित इंग्रजींत वर्णन करूं लागले. शब्द निवडक, आवाज मोठा पण कर्कश नाही, वाक्यरचना अर्थपूर्ण. त्यांचे डोळे चमकूं लागले. नाकपुडया मधेच मोठया होत. नाकाचें टोक किंचित् हाले. वाणीबरोबर त्याचाही परिणाम होई. सैतानाच्याही स्वभावापासून त्याचा कणखर मानीपणा कसा घेण्यासारखा आहे हें जेव्हा ते विशद करूं लागले तेव्हा तर टाळ्याच पडल्या.

या वेळीं आपल्याकडे सर्वजण बघत आहेत असें उगीचच तारेला वाटलें.

इंग्रजीचा तास संपला. सर्वजण आपापल्यापरीने उल्हसित होतीं. ज्याच्या त्याच्या तोंडीं प्रो. देवधर आणि त्यांचें लेक्चर. कुसुम व नलिनी लेक्चर संपल्यावर एकदम दिनकरकडे, नलिनीच्या भावाकडे गेल्या. आपल्या कॉलेजतर्फे दुसऱ्या दिवशींच्या डिबेटमधे देवधरांची बोलण्याची योजना करण्याविषयी त्याला त्यांनी आग्रह केला. त्यालाही तें पसंत पडलें. तो त्याच कॉलेजमधे बी. ए. च्या वर्गांत होता. कॉलेजचा जय व्हावा असें त्याला वाटत होतेंच. वादविवादामधे विद्यार्थ्यांबरोबर दोन्ही कॉलेजांमधला एकेक प्रोफेसर बोलण्याची रीत होती. झेवियरच्या बाजूने नेहमीच चांगलें बोलणारा प्रोफेसर मिळत असे. पण आता तोडीस तोड देवधर छान होतील असें त्यांना वाटून त्या सर्वांनी कमिटी व देवधर यांचें मन-वळवून घेतलें.

तारा या बाबतींत अगदी मुग्ध होती.

—३—

दुसरे दिवशीं वादविवाद झाला. प्रेक्षक खूप रंगले होते. झेवियर मधल्या एका विद्यार्थ्याने ठरावाविरुद्ध फारच मुद्देसूद भाषण केलें. त्याचें इंग्रजी म्हणजे फार उच्च दर्जाचें होतें असें कांही नाही. पण त्याच्या भाषणांत प्रमाणबद्धता होती, व्यवस्थितपणा होता. भाषण सहज बोलल्यासारखें झालें. त्याचा इतका परिणाम झाला की, भाषणाच्या शेवटीं बऱ्याच टाळ्या पडल्या. विरुद्ध बाजूच्या प्रेक्षकांनाही टाळ्या देण्याचा मोह आवरला नाही.

अर्थात् त्याच्या नंतर दुसरें तितकेंच परिणामकारक भाषण व्हायला पाहिजे असें विल्सनच्या मंडळींना वाटूं लागलें. त्याप्रमाणे त्यांच्यामधे कुजबूज सुरू झाली. देवधरांचें नांव निघालें. पण त्यांना शेवटीं ठेवणें जरूर होतें. अर्थात् एकमताने तारेला पुढे करायचें ठरवलें. त्याप्रमाणे तिला आग्रह झाला. ही पहिलीच वेळ होती की, तारेने एकदम हो म्हटलें नाही. पण तसें आपल्या हातून घडलें हें कुणाच्याहि लक्षांत येऊं नये या तीव्रतेने उसळणाऱ्या इच्छेने तिने लगेच हो म्हटलें. टेबलाजवळ येऊन ती उभी राहिली. पहिलें वाक्य तिच्या तोंडून बाहेर पडणार तोंच देवधर आपल्याकडे बघताहेतसें तिला वाटलें. त्यानंतर ती जें कांही बोलली तें तिचें तिलाच नंतर सांगतां आलें नाही.

ठरल्यापेक्षा नेहमी तीनचार मिनिटें तिला जास्त देण्याचा परिपाठ पडला होता. या वेळीं तिचें भाषण ठरीव वेळापूर्वी तीनचार मिनिटें अगोदरच संपलें. कोणी पसंतीच्या टाळ्या वाजवल्या नाहीत. स्टँपिंगही झालें नाही. निराशेची शांतता सर्वांनाच त्रासदायक वाटत होती.

पुन्हा झेवियरचे वक्ते—प्रोफेसर उभे राहिले. त्यांचें भाषण एरव्हीं फारसें चांगलें ठरलें नसतें. निराशेच्या पार्श्वभूमीवर तेंच

सरस ठरलें. जयाचा काटा झेवियरकडे वळूं लागला. शक्य त्या मार्गांनी तें स्पष्ट होऊं लागलें. सर्वांचें लक्ष शेवटचे वक्ते देवधर यांच्याकडे साहजिकच गेलें.

ते शांतपणे पुढे झाले. प्रथम मोजक्या शब्दांत त्यांनी झेवियरच्या वक्त्यांची तारीफ केली. सैवच श्रोत्यांना त्यामुळे बरें वाटलें. नंतर ते मुख्य विषयाकडे वळले. अगदी वेचक मुद्दे घेऊन त्यांनी लीग ऑफ नेशनचें हिंदुस्थानचें सभासदत्व हा एक फार्स कसा आहे, याचें परिणामकारक चित्र रंगवलें. भाषण रसोत्कर्षाच्या स्थितीला जाणार तों अध्यक्षांनी घंटा देऊन त्यांच्या भाषणाची वेळ संपली म्हणून सूचना दिली. "बोलूं द्या, बोलूं द्या." म्हणून प्रेक्षकांनी एकच गोंधळ केला. श्रोत्यांचे ते शब्द व अध्यक्षाची घंटा यांनी पांच मिनिटें एकच गोंधळ झाला. शेवटीं अध्यक्षांना हार खावी लागली.

ठराविक वेळेपेक्षा तीन चार मिनिटे या वेळीं देवधरांना जास्तच मिळालीं.

गोष्ट नमूद करण्यासारखी झाली. या तीन चार मिनिटांच्या अखेरच्या भाषणांत देवधरांनी कमाल केली. अर्थात् याचा परिणाम अखेर व्हायचा तोच झाला. विल्सन्चा जय झाला. घरीं परत येतांना सगळे जण देवधरांभोवती गोळा होत, त्यांच्याशीं चार चांगले शब्द बोलत, काही तर नुसतं स्तुतिदर्शक हसून जात.

तारा एकटीच एकीकडे उभी होती. 'मनोहर, त्याचा मित्र दिनकर, नलिनी, कुसुम वगैरेंचा घोळका दुसरीकडे बोलत उभा होता. त्यांच्या तोंडून निर्हेतुकपणे देवधरांची स्तुति निघत होती. लगेच नलिनीचें लक्ष तारेकडे गेलें. अगदी सहज ती तारेकडे गेली. मागोमाग सर्वजण होतेच.

"देवधरांनी आज कमाल केली नाही?" आनंदाच्या उसळीने नलिनी तारेला म्हणाली.

"Often चा उच्चार 'ऑफ्टन' करायचा तो त्यांनी 'ऑफन'च केला." तारा चटकन् बोलली.

एकही शब्द न बोलतां मनोहरने पांच दहा सेकंद तारेकडे बघितलें.

—४—

चार आठ दिवस तो वादविवाद व देवधरांचें वक्तृत्व हा ज्याच्या त्याच्या तोंडीं विषय असल्यास नवल नाही. तो ताजा रहायला दुसरें कारण म्हणजे देवधरांचें उत्तम शिकवणें. अर्थात् दिनकर, तारा, मनोहर, नलिनी वगैरे मित्रमंडळांत तो चर्चेचा विषय राहणें साहजिक होतें. नलिनी आणि कुसुम ह्या फार बोलत. इतक्या की तारा या विषयावर जवळजवळ बोलत नसे, ही गोष्ट त्यामुळे फारशी कोणाच्या लक्षांत येत नसे. दिनकर बोलायचा पण बेतांत. त्याचें लक्ष ताराकडे असे—पण तें त्याच्या स्वतःच्या अंतरंगांतून असे. मनोहर मात्र बोलायचा नाही. तो बहुतेक सगळीकडे बघत असायचा. त्याने तोंड जर उघडलेंच तर तें फक्त दिनकर एकटा असतांना. पण थोडेंफार तो जें कांही बोले तेंही दिनकर त्याला अशक्य करूं लागला होता. कारण दोघे एकटे असतांना दिनकर एकसारखा उगीचच ताराविषयी बोले. "तिची उंची किती मनांत भरण्यासारखी आहे—बाकीचे अवयव जरी इतके आकर्षक नसले तरी डोळे कसे छान आहेत—" वगैरे वगैरे.

मनोहर नुसतें ऐकून घेई. विचार करी. दिनकरला उत्तेजन किंवा सहानुभूति कांहीच न मिळाल्यामुळे तो कधी हिरमुसला होई,

तर कधी चिडे. एके दिवशीं तो तिच्या डोळ्यांचें फारच वर्णन करूं लागला. "तिच्या डोळ्यांत निःस्पृहतेचें तेज आहे नाही!"

"निःस्पृहतेचें!" एवढेंच म्हणून मनोहर थांबला. मधेच थांबल्याबद्दल दिनकरने त्याला बरेंच विचारलें. पण मनोहर एकही शब्द बोलला नाही. एकदा नुसता तो हसला. त्यावर चिडून दिनकर निघून गेला.

यानंतरही आणखी कांही दिवस गेले. ताराला इंग्रजी विषयांतल्या अडचणी फार येऊं लागल्या. त्या सोडवण्याकरतां देवधरांच्याकडे वारंवार जावें लागतें असें ती सांगत असे. देवधरांच्या वक्तृत्वाऐवजी त्यांच्या चेहऱ्यावरील उदासीनतेची जी छटा वाढत चालली होती तीच दिनकर नलिनी वगैरेंचा वादविषय हल्ली वारंवार होत असे. ताराच्या डोळ्यांचें वर्णन मनोहराजवळ वाढत्या प्रमाणांत होत होतें.

"तिच्या डोळ्यांतलं तेज कमी झाल्यासारखं दिसतं रे!" एके दिवशीं दिनकर म्हणाला. मनोहराच्या चेहऱ्याकडे त्याने बघितलें. त्यावर त्याला काळजीची छटा दिसली. दिनकरला वाटलें आपल्याकरतां ती काळजी आहे. गोष्ट खरी होती. कारण तो गेल्यावर मनोहराने एक सुस्कारा टाकला व "या पोराची काळजी वाटते" एवढेंच तो स्वतःशीं बोलला.

दोन तीन दिवसांनी दिनकर एकाएकी दुपारीं मनोहरकडे आला आणि आधी 'सेसिल'मधे चल असें म्हणून मनोहरला तो जबरदस्तीने घेऊन गेला. रस्त्याने तो एक शब्द बोलला नाही —ताराबद्दलही एक शब्द नाही. तेव्हा हें न बोलणें तारासंबंधी असावें असा त्याने तर्क केला. मनोहरने मुकाट्याने त्याला सेसिलमधल्या माडीवरच्या टेबलाजवळ नेलें– "दो थंडा सोडा लाव" म्हणून पोऱ्याला त्याने हुकूम केला. समोरच्या खिडकीं-

तून मागच्या लहानशा टाक्यांतील हिरव्यागार पाण्यावरील सूर्य-प्रकाशाकडे तो एकसारखा बघत होता व एकसारखा अखंड बोलत होता—

"Don't take revenge. She is engaged." दिनकर चिडला. मनोहरचा दंड धरून त्याने जोराने त्याला हलवलें. मनोहर शांतपणे सोडा पिऊं लागला.

"मी काय सांगतों आहें? ताराचं देवधरांशीं लग्न ठरलं." दिनकरचा स्वर कंपित झाला.

"मग सरळ तिच्याकडे जा आणि तिचें अभिनंदन कर." सोडावॉटरचा ग्लास मनोहरने एकदम खाली ठेवला. दिनकरचा दंड धरून त्याला त्याने जिन्यावरून खाली लोटला. आपण त्याच्या मागून दडदड जिना उतरला व मॅनेजरकडे दोन आणे फेकून चालता झाला. दिनकर फुटपाथवर येऊन त्याच्याकडे पहातच राहिला.

—५—

दिनकर घरीं गेला. स्वस्थ खोलींत बसला. तो रागावला होता. अर्धा तास झाला नसेल तों मनोहर टेनिसची रॅकेट घेऊन त्याच्याकडे आला, त्याला जिमखान्यावर चल म्हटलें. तो जागचा हालेना. मनोहरने त्याचा कोट घेऊन जबरदस्तीने त्याच्या अंगांत चढवला. टोपी डोक्यावर फेकली. रॅकेट त्याच्या हातीं दिली तरी दिनकर जागचा हालेना. मनोहर त्याच्याजवळ गेला. हळूच त्याचा हात त्याने आपल्या हातीं घेतला आणि "My dearest friend!" एवढेंच तो बोलला. त्याचे डोळे आर्द्र झाले होते. दिनकर पुढे झाला आणि म्हणाला "मनोहर"—

"कोर्टाकडे तावडतोब चल, नाही तर डोकें फोडीन." मनोहर ओरडला. दिनकरचें त्याच्यावर प्रेम होतें. तो मुकाटयाने उठला अन् खेळायला गेला. एक, दोन, तीन, दहा दिवस मनोहर त्याला विसंबला नाही. सदा खेळ, जिमखाना, हॉटेलमधे दहा दहा वेळ चहा, असे त्याने स्वतःवर व दिनकरवर अत्याचार चालवले होते. पुढे एक दिवस दिनकरच मनोहरला वरप्रमाणे खेळायला न्यायला आला. एकसारखा तीन दिवस आला. चौथे दिवशीं मनोहरने त्याला तसेंच येतांना पाहिलें "माझे उपचार लागू पडले, ईश्वराचीच कृपा." एवढेंच तो बोलला.

तारा–देवधरांचें लग्न जानेवारींत व्हायचें होतें. लग्नापूर्वी तिच्या मैत्रिणींत हा विनोदाचा व आनंदाचा विषय झाला होता. एके दिवशीं लग्न कसें ठरलें याची हकीगत ताराने सर्वांना सांगितली. कॉलेज वादविवादाच्या दिवशीं देवधरांचं भाषण ऐकल्यापासून आपल्याला 'कसंसंच' वाटू लागलं. पुढे त्यांचं रोजचं शिकवणं ऐकून तें वाटणं इतकं वाढूं लागलं की घरीं कांहीही करायला घ्या त्यांचा भास जिथं तिथं होई. शेवटीं त्यांना डिफिकल्टी विचारण्याच्या निमित्तानं आपण त्यांचेकडे धिटाईनं जायला लागलों व एके दिवशीं आपली लग्न करण्याची इच्छा त्यांचे-जवळ व्यक्त केली. तों कळलें की त्यांचें प्रेम त्या मालती भावेवर असून तिने आपलं उत्तर देण्याची टाळाटाळ दोन तीन महिने चालवली आहे. तिचें उत्तर मिळाल्याशिवाय आपण कांही करूं शकत नाही असें त्यांनी सांगितलें. अखेरीस निराशा होण्याच्या शक्यतेमुळे आपणास रडूं कसें येत असे, येथवर ती आली.

"देवधरांच्या चेहऱ्यावरील उदासीनता वाढते आहे" व "तारेच्या डोळ्यांतलें तेज कमी होत आहे" या दोन वाक्यांची मनोहरला आठवण झाली.

तो विचारमग्न झाला.

" एक महिन्यापूर्वी मालतीने नकारार्थी उत्तर दिलं. देवधरांची फार निराशा झाली. त्यांची उदासीनता वाढली. पण एके दिवशीं इंग्रजीचा तास संपल्यावर त्यांनी मला हाक मारली. पांच दहा मिनिटें इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून झाल्यावर त्यांनी एक बोटभर कागदावर लिहिलेलं पत्र मला दिलं. त्यांत दोनच ओळी होत्या. " तुमच्याविषयीं पूर्वीपेक्षा आता निराळं वाटूं लागलं आहे." मी त्यांच्या मागोमाग त्यांच्या खोलीवर गेलें अन् ठरलं "—

प्रेमकहाणी ऐकणं कोणाला आवडत नाही ? त्यांतून एका मैत्रिणीची ती प्रेमकहाणी. ती ऐकण्यांत सर्व दंग होतीं. दिनकर स्वस्थ होता. मनोहर मात्र कसलं तरी पृथक्करण करीत होता. प्रणयी जनांच्या रोजच्या भेटींतली हकीगत तारा सांगायची, अगदी बारीक-सारीक सुद्धा सांगायची. आणखी बारीकसारीक समजावून घेण्याकरतां उत्सुकता श्रोत्याकडून दाखवली जात असे, तारा ती पुरवी.

" इतक्या बारीकसारीक खाजगी गोष्टी कशी सांगूं शकते ही ? " मनोहर रोज स्वतःला विचारी.

—६—

टर्म संपली. नलिनी, दिनकर घरीं जायला निघालीं. त्यांनी मनोहरला सुट्टींत आपल्या घरीं चल म्हटलें. त्याने नाही म्हटलें. ताराचें लग्न झालें आणि ती संसारांत पडली म्हणजे मग कसल्या वारंवार भेटीगाठी ? म्हणून नलिनीने तिला आपल्या घरीं बोलावलें. ती कबूल झाली. ती सर्व मंडळी बोरीबंदरवर आली तों मनोहर आपली बॅग घेऊन धावत आला.

" अं ? इकडं कुठं ? " सर्वांनी आश्चर्याने विचारलें.

"तुमच्या बरोबर—तुमच्याच घरीं." सर्वांचें आश्चर्य द्विगुणित झालें.

नलिनीच्या घरची मंडळी उदार मताची होती. त्यामुळे सहाध्यायी मंडळींचें हें संमेलन पाहून त्यांना फार आनंद झाला. हसण्याखिदळण्याचें, गप्पागोष्टींचें, फिरण्याचें, सर्वच बाबतींत स्वातंत्र्य. तारा अतिशय मोकळेपणाने वागायची. दिनकर त्या मैत्रिणींमध्ये फार पॉप्युलर झाला होता. सकाळीं तोंड धुवायला तो बसला नी तारा आली की, तो ऊन पाण्याची तपेली भरून पुढे करायचा. नलिनी चहा गाळायला लागली की तो टोस्ट करायचा व सर्वांच्यापुढे ठेवायचा. रात्रीं गप्पा मारायला मैत्रिणी आल्या की हा चटकन् ईझीचेअर पुढे करायचा. हें अगदी सहज होत असे. बायकांशीं बोलतांना कोणत्या वेळीं कसे शब्द वापरावेत हें त्याला बरोबर कळे. तो असला की संभाषणाला रंग चढे. एके दिवशीं गावांतल्या मित्रांकडे तो भेट द्यायला गेला. परत यायला अर्थात् त्याला वेळ लागला. तीन वेळां तारा अगदी सहज म्हणाली. "दिनकर केव्हा येणार बाई!"

मनोहर त्याला "लेडीज मॅन" म्हणूं लागला होता. "मिस्टरी मॅन" म्हणून दिनकरने उलट त्याला पदवी दिली होती.

अशा तऱ्हेने त्या सर्वांचा वेळ आनंदांत चालला होता. दिनकर अधिकाधिक पॉप्युलर होत चालला होता. एके दिवशीं नलिनीला तिची मावशी रहायला बोलवायला आली. तिला जाणें भाग होतें. रात्रींही ती तिकडेच निजणार होती. त्या दिवशींच्या रात्रीच्या गप्पांना अर्थात् तीनच मेम्बर्स हजर. आज दिनकर खूप खुलला होता. तारा एकसारखी त्याच्याकडे बघत होती. तिच्या डोळ्यांत कुणास कां ठाऊक, पण एकदोनदां अश्रू आले. दोन वाजले तेव्हा सर्व निजलीं. मनोहर नेहमी उघड्यावर व्हरांड्यांत

निजत असे. दिनकर आंतल्या खोलींत व मधल्या खोलींत तारा. निजून थोडा वेळ झाला असेल नसेल तोंच "दिनकर दिनकर" म्हणून तारा हाका मारते आहेसें वाटलें. मनोहर व दिनकर दोघेहि तिच्याकडे गेले. ती जागी होती. विचारलें तर "कांही नाही" म्हणून तिने चटकन तोंडावर पांघरूण घेतलें. दुसरे दिवशीं नलिनीला ताप आला म्हणून ती आईजवळ निजली. रात्रीं गप्पा मारायच्या वेळेला दिनकरच्या वागण्यांत एक तऱ्हेचें मार्दव दिसत होतें. त्याही रात्रीं पुन्हा तारेची हाक. पण या वेळेस ती आपल्या अंथरुणावर नसून दिनकरजवळ येऊन उभी होती. दिनकर जागा होऊन तिच्याकडे पहात होता. त्याने आपला हात पुढे केला होता. इतक्यांत मनोहर आंत आला व त्याने चवकशी केली.

"मला झोप येत नाही." असें म्हणून तारा झटदिशीं आंत गेली.

"अर्धवट झोपेंत आहे झालं." मनोहर सहज बोलला. दिनकर आपल्या कॉटवर बसून समोर पहात राहिला. मनोहर त्याच्याजवळ अगदी त्याला चिकटून बसला. बराच वेळ झाला, दिनकर एक शब्द बोलला नाही. मनोहर मात्र एकसारखा बोलत होता. दिनकरचें आपल्याकडे तिळमात्र लक्ष नाही हें माहीत असूनही तो एकसारखा बोलत होता. इतका की, सकाळ झाली, चहा झाल्याची वर्दी आली, तेव्हा त्याने अंथरुणावरून उडी मारली. भराभर चुळा टाकल्या. चहा गटागट प्याला. दिनकर ताराला चहा देण्यांत दंग आहेसें पाहून तो निसटला व कोट टोपी अंगावर चढवून बाहेर पडला. अर्ध्या तासाने तो घरीं आला. आंत शिरतांना त्याने एकदा खिशांत हात घातला. त्याच्या हाताला तारेची रसीद लागली. ती त्याने नीट ठेवली. चहाच्या जागीं गप्पा एकद सुरू झाल्या की तासभर तिथली बैठक कांही मग हलायची नाही

असा रोजचा प्रकार असे. मनोहर सदाच तेथे बसत नसे. चहा झाला की तो बाहेर येऊन सकाळचीं वर्तमानपत्रें वाचीत असायचा. तेव्हा त्याचें बाहेर जाणें कोणाच्या लक्षांत येण्यासारखें नव्हतें. नलिनीला आज बरें वाटत नव्हतें.

दुपारीं चार वाजतां चहाला सर्व मंडळी बसली होती, तों एक अर्जंट तार मनोहरच्या नांवें आली. ती त्याने फोडून सर्वांना वाचून दाखवली. "Critical Situation. Come at once with Dinkar—Yeshwant Date." यशवंत हा त्यांचा तसाच एक स्नेही होता. काय प्रसंग आहे तें कळावें म्हणून पुन्हा तार करावी, तर वेळ नाही. कारण मेल ५॥ ला जाणार. शिवाय "गेलंच पाहिजे." म्हणून मनोहर एकसारखा काळजीयुक्त चेहऱ्याने म्हणत होता. अखेर दोघांनीहि सामान बांधलें. स्टेशनवर त्यांना पोचवायला तारा व नलिनी आल्या होत्या. "आम्ही दोघं तुमच्या लग्नाला येऊं बरं का" असें दर दहा सेकंदाला मनोहर ताराला आश्वासन देत होता.

गाडी सुटायची घंटा झाली. दोघेही वर चढले. ताराचे डोळे, कां कुणास ठाऊक, पण पाण्याने भरून आले. आपली मैत्रीण किती प्रेमळ आणि कोवळ्या मनाची आहे म्हणून नलिनीला साभिमान कौतुक वाटलें. गाडी चालू झाली. दिनकर रुमाल हालवीत होता. प्लॅटफॉर्मवरचें चिटपाखरू दिसेनासें होऊन गाडी डिस्टंट सिग्नलपर्यंत आली तरी तो रुमाल हालवीतच होता.

"हा पागलपणा पुरे कर." मनोहर त्याच्या कानांत ओरडला. दिनकरचा रुमाल खाली पडला. "पडूं दे पडला तर". असें म्हणून दिनकरला त्याने आंत ओढलें.

"मला वाटतें तिचें माझ्यावर प्रेम आहे." बाकावर बसत दिनकर श्वास सोडून म्हणाला.

"त्या सुंदर सूर्यास्ताकडे पहा." मनोहरने एकदम खिडकीबाहेर तोंड काढलें. सूर्यास्ताच्या वेळच्या विविध रंगांचें, घसा फोडून, पण बाहेर तोंड ठेवून त्याने वर्णन सुरू केलें. सूर्य पूर्णपणें अस्तास गेल्यावर त्याने तोंड आंत घेतलें. पण वर्णन थांबलें नाही. चौपाटीवरून, हँगिंग गार्डनवरून आणि मुंबईंतल्या आणखी पन्नास जागांवरून सूर्यास्त कोणास कसा दिसला, विलायतेंत, फ्रान्समधे आणि पांचही खण्डांत सूर्यास्त कसा दिसत असला पाहिजे, याचे रसभरित अंदाज त्याने खडया सुरांत सांगण्यास सुरवात केली. दिनकर चडफडला. आंतल्या आंत चडफडला. पण इतक्या दिवसांच्या मनस्तापामुळे तो आधीच थकला होता. त्यांतून मनोहरचा भडिमार. तो सहज पाटीमागे टेकला व केव्हा झोपी गेला तें त्याला कळलें नाही. मनोहरने एकदा त्याच्याकडे प्रेमाने बघितलें.

"हे सूर्यनारायणा, तूंच आज माझ्या मित्रास वाचविलंस."— असें म्हणून त्याने खिडकीबाहेर तोंड काढलें व मावळलेल्या सूर्यनारायणाकडे तोंड करून त्याने भक्तिभावाने नमस्कार केला.

—७—

सकाळीं बोरीबंदरवर दोघे उतरले. "तूं जा सामान घेऊन आपल्या रूमवर. चहा तयार ठेव. मी यशवंताला तिकडेच घेऊन येतों. आपल्या खोलींत बरं पडेल बोलायला." असें घाईने बोलून, दिनकरच्या हो नाही म्हणण्याची वाट न पाहतां मनोहर चालता झाला. थोडया वेळाने तो यशवंतासह खोलींत आला. "माफ कर हं दिनकर. उगीच त्रास झाला तुम्हांला! अरे, आमच्या काकांनी त्या +.+ + +मुलीशीं माझ्या लग्नाचा ठाम बेत ठरवला होता. काय करावं कांही सुचेना. तुम्हांला तार केली. इतक्यांत देवच पावला. मुलीच्या बापाला कमी हुंडयाचं स्थळ मिळालं. काल रात्रीं एका-

एकी त्यानंच काकांचा नाद सोडला." असें म्हणून यशवंत मोठ्याने हसला. मनोहर त्याहीपेक्षा मोठ्याने हसला. त्या विषयावर थोडी मजेदार चर्चा होऊन यशवंत घरीं आला.

तारा-देवधरांचें लग्न झालें. कबूल केल्याप्रमाणे लग्नाला चल म्हणून दिनकरने मनोहरला खूप आग्रह केला. मनोहर नेमका गेला नाही. फक्त नलिनीच लग्नाला गेली होती. मालती भावे लग्नाला हजर होती. खुद्द देवधरांच्याच निमंत्रणावरून हजर होती, असें परत आल्यावर नलिनीने सांगितलें.

ताराचा संसार सुरू झाला. देवधरांना + + + + कॉलेज मधे जास्त पगाराची व कायमची जागा मिळाली. ते तारासह मुंबई सोडून गेले. या गोष्टीला दोन तीन महिने झाले होते. तेवढयांत देवधर दोन वेळ मुंबईस येऊन गेले. दोन्ही वेळां मालती भावेला भेटून गेले. ताराने सर्व मित्र मैत्रिणींना दोन दिवस आपल्या घरीं बोलावलें. "मला करमत नाही—वेळ जात नाही" असेंही तिने एकदा लिहिलें होतें. नलिनीची परीक्षा जवळ आली होती म्हणून दिनकर व मनोहर दोघेच गेले. देवधर चांगले वागत. मोकळेपणाने वागत. पण ते फार थकलेले दिसत. ते त्या दोघांशी बोलत—खूप बोलत. तारा आली की थोडं बोलत अन् चूप बसत. तारा देवधरांशी एकसारखा वाद घाली. ते चूप बसे तों वाद घाली. वादाला कारणही फारसें मोठें लागत नसे. स्वैंपाकघराच्या खिडकींतून समोरचीं माणसें बघेतात. तेव्हा तिला एक पडदा लावावा असें एकदा ते सहज म्हणाले. त्यावर 'कांही काळजी करूं नका. तुमची बायको कोणी. पळवून नेत नाही' असें ती म्हणाली. झाला वाद सुरू. "चहा बशींतून पिण्यापेक्षा कपांतून पिणं चांगलं" असें ते म्हणाले. "हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत बशींतून चहा पिणं योग्य आहे" असें ती बोलली.

पुन्हा वाद सुरू झाला. इतका माजला की देवधर एकदम उठले व एके ठिकाणीं जायचं आहे, म्हणून बाहेर गेले. त्या दोघांना तारेने लग्नापासून आतापर्यंतचा सर्व इतिहास सांगायला सुरवात केली. "चर्चा करायची नाही, तर शिकलेली बायको केली कशाला ? त्या मालतीला भेटायला गेले "—एक ना दोन. दिनकर थक्क झाला. ती आंत कामाला गेली तेव्हा त्याने आपलें आश्चर्य प्रगट केलें. "अं त्यांत काय आहे ? एवढ्यावरच भागलं म्हणजे मिळवली." मनोहर हातांत टाइम्स घेत म्हणाला. त्याने सबंध अंक आपल्या तोंडासमोर धरला; त्यांतलें एंजीनिअरिंग सप्लिमेंट तो अतिशय आवडीने आणि मोठमोठ्याने दिनकरला वाचून दाखवूं लागला.

—८—

त्यानंतर एक महिन्याने कळलें की देवधरांना क्षय झाला असून ते पांचगणीला गेले आहेत. "क्षयाचं दुखणं लागट असतं तेव्हा तूं माझ्यापासून दूर रहा." असें तिला त्यांनी सांगितलें म्हणून ती दूर राहिली. ती पुन्हा कॉलेजमध्ये जाणार असेंहि कळलें. त्या वेळीं दिनकरला बरें नव्हतें म्हणून तो हवा पालटण्याकरतां घरीं गेला होता. त्याचेंहि मनोहरला पत्र आलें. त्यांत "देवधरांना क्षय, झाला....फार वाईट वाटतं.......बिचारी तारा.... ..." असा मजकूर होता.

पत्र वाचून मनोहर विचारमग्न झाला. इतका विचारमग्न तो पूर्वीं कधीच दिसला नव्हता. शेवटीं त्याने उत्तर लिहिण्यास सुरवात केली.

"......दिनकर तूं मला "मिस्टरीमॅन" म्हणतोस. मी परन्ही फारसा बोलत नाही म्हणून माझ्यावर रागावतोस. पण

मी आज खूप बोलणार आहें. माझे विचार मलाच असह्य झाले आहेत. मी बोलत नाहीं. खरं आहे. मी त्या वेळीं आंत खूप बोलत असतों.······एकसारखं कशाचं तरी पृथक्करण करीत असतों. ही देवधरांच्या विषयींची बातमी कळविलीस —काय वाटलं असेल मला ?······माझ्या डोक्यांतले विचार मात्र असह्य झाले आहेत.······तारा-देवधरांचं लग्न झालं कसं ?······तारा ! तुला ती आवडते···क्षणिक विकाराला एकदम इतकी बळी पडणारी मुलगी माझ्या तरी पाहण्यांत दुसरी नाही.···ती स्तुतिप्रिय आहे.······देवधरांच उत्तम शिकवणं···वादविवादांतला त्यांचा जय···आपण आता लोकांच्या लक्षांतून जाऊं ही तिची भीति तिला असह्य झालेली— इकडे देवधरांच्या वक्तृत्वाचा पगडा पाहिल्यापासूनच मनावर बसलेला···या सर्वांतून मनाप्रमाणें बाहेर पडण्याचा एकच मार्ग ··ज्यांच्यामुळं आपण लोकांच्या लक्षांतून जाऊं तेच आपले—आपलेच झाले तर—होतील कां आपले ? ही मनाची ओढ···किती रम्य कल्पना···किती रम्य ओढ ?······त्यांच्या वक्तृत्वाचा पगडा व हा मोह याची विलक्षण ओढ तिच्या मनाला······झालं, ती ओढ म्हणजे प्रेमच आहे असं तिला वाटलं.···मालतीवरचं त्यांचं प्रेम कळल्यावर ती रडे ····· कशाकरितां ? प्रेमनिराशेमुळे ? कां देवधर आपणास मिळूं शकत नाहीत या निराशेमुळे ? रडण्यामुळे तिच्या डोळ्यांतलं तेज गेलंसं तुला वाटलं ··आधीच तिचे डोळे चांगले–त्यांत कारुण्य आलं·· देवधर–मालतीसंबंधींच्या प्रेमनिराशेचा त्यांना धक्का बसला.···निराश झालेल्या मनाला विसाव्याची भूक लागली.···तारा रोज वर्गांत समोर दिसे··तिची निराशा त्यांच्या लक्षांत वारंवार···समानदुःखामुळे त्यांच्या अंतःकरणांत तिच्याविषयीं कळवळा उत्पन्न होत असेल—हा कळवळाच प्रेम आहे असं तर त्यांना–मालती नाही तर नाही·· तारासारख्या

पाणीदार डोळ्यांच्या सुशिक्षित स्त्रीचा आपण प्रेमविषय होऊं शकतों, यानं माणसाच्या विकारक्षम मनावर चढणारा मोह —मद ?…एका स्त्रीच्या मनावर आपण ताबा चालवीत आहोंत यामुळे कदाचित् मालकी मिळविण्याची पुरुषी थाटाची शारीरिक ओढ…या सगळ्यांचा एकत्रित परिणाम म्हणजे "प्रेम" समजून ताराला एक दिवशीं दिलेली ती दोन ओळींची चिठ्ठी‥खरोखर, हा तारेचा विजय होता, पण त्यांचा सत्यानाश…

तुला आठवतं लग्न ठरल्यावर उभयतांच्या प्रणयांतल्या सर्व गोष्टी अगदी बारिकसारिकसुद्धा रोज ती सांगत असे‥गाढ प्रेमाला वाचा फार कमी असते म्हणतात ‥सुटींत तुझ्या घरीं येत नव्हतों‥ती येणार म्हणून कळलं‥ती नी तूं! झक मारत आलों‥इकडे तुझ्या घरीं असतांना तुझ्या संभाषणशैलीवर, उत्तम रीतीभातींवर खूष होऊन तुझ्या बाबतींत काय प्रकार ‥ जाऊं दे परमेश्वरानं मला ती खोटी तार‥मठ्ठ मनुष्या, आता तरी तुझा बचाव केला म्हणून परमेश्वराचे आभार मान! इकडे लग्न झालं‥लग्नाच्या दिवशीं देवधरांच्या निमंत्रणावरून मालती हजर…स्त्रियांचा स्वभाव‥प्रेमानं त्यांचं हृदय काबीज करण्याऐवजी मालतीपेक्षा बुद्धीनं आपण श्रेष्ठ आहोंत हें सिद्ध करण्याचा अनिवार मोह ‥उगीचच एकसारखा वाद— मत्सरी वाद…*Instead of winning his affection she turned the home (?) into a battle-field*‥वाद करून सर्वांसमक्ष त्यांना चूप बसवणं आणि समाधान मिळवणं हाहि तिच्या नकळत तिच्या सूडाचा हेतू होऊन बसला असेल‥*Result : The fellow seems to have taken everything to heart……Consumption !* ……कसला आलाय *Consumption !……merely an excuse to run away from home.* तारा थोडी-निराळी

वागूं दे *Consumption* वगैरे पार पळून गेला असं तुला दिसेल · ढोंगच मुळी ते···तुझं पत्र आलं तेव्हा "फक्त कुमारिकांसाठी" म्हणून एक गोष्ट प्रसिद्ध झाली आहे ती वाचीत होतों. तींत कायसं खालील अर्थाचं म्हटलं आहे.···"खरं प्रेम थोडं फार अविचारीच असतं. खोल विचारान्तीं होणारे विवाह कधीच सुखाचे होत नाहींत. प्रेमाच्या बाबतींत कधीच फार विचार करू नका. प्रेमाचं आणि विचारांचं पटलं नाही."···वगैरे···पण जें, जेव्हा आणि जसं वाटतं तें सर्व "खरं प्रेमच" आहे का? याचा तरी विचार?—···कां वाटलं तें लगेच प्रेम समजून खोल विचार न करतां लगेच —विवाह? किती सुशिक्षित तरुण-तरुणींची संसारनौका या खडकावर आपटण्याच्या बेतांत · अगदी उभयपक्षी गाढ प्रेम असलं तरी *Law of constant mutual adjustment is perhaps the true basis of happy married life* जाऊं द्या. सुशिक्षित तरुण तरुणींचे विवाह हा पुढच्या दहावीस वर्षांतील एक *paoblem* होऊन बसला आहे असं कायसं एक लेखक म्हणतो – तर दुसरा प्रेमाच्या—विवाहाच्या बाबतींत *spirit, soul, body,* असा क्रम राहण्याऐवजी *body, soul, spirit* असा घातुक क्रम दृष्टीस पडतो म्हणून ओरड करतो "इकडे कांही अयशस्वी विवाह पाहून ज्या स्त्रिया खरोखरच – विवाह सुख देण्यास आणि घेण्यास पूर्णपणें लायक आहेत त्या भिऊन विवाहासंबंधी उदासीन होत चालल्या आहेत"···काय करूं? या विचारांनी माझं टाळकं फुटायची वेळ···*But please don't suppose that whatever I have said must be true*·····माझं सोडून दे पण बाह्य *charms* उत्तम *manners* यांच्या वर्णनांनी कांही विद्वान् लेखकांनी तरुणांचीं मनं मारून टाकलीं आहेत त्या लेखकांपैकी कांही मानसशास्त्रज्ञही असतील तरुण-

तरुणींच्या अंतरंगाचं सूक्ष्म पृथक्करण करून उत्तम मार्गदर्शक वाङ्मय जर त्यांचेकडून निर्माण होईल……पण लक्षांत कोण घेतो?……*I pity Deodhar……*

तुझा—मनोहर

*P. S. (1) one thing more* कुसुमला आठ दिवसांपूर्वी ताराचं पत्र आलं. त्यांत तुझ्या घरीं असतांना, तिच्याशीं तूंच मर्यादेबाहेर वागत होतास अशी तुझी निंदा आहे.

"मन्या"

*P. S. (2)* अरे हो. *That silly girl*—सुमति दांडेकर…*She still persists in believing that I return her love.* संभावितपणा न सोडतां जितक्या स्पष्टपणें सांगतां येईल तितक्या स्पष्टपणें "तसं कांही नाही" म्हणून मी तिला दर्शविलं…*She is adamant.* अखेरीस "मला या जन्मीं लग्न कर्तव्य नाही" असं "माझ्या" मोठ्या अक्षरांत निनावी पत्र लिहून तें तिच्या पुस्तकांत ठेवलं आहे……*If she does not understand, let her also go to hell……* कॉलेजांतल्या अभ्यासक्रमांत, पुरुषांकरितां "*A litlle more constancy in sentiment* आणि बायकांकरितां "*A litlle more commonsense*" हे "आवश्यक विषय" ठेवावेत असं आपला तो "मिस्किल मित्र बापू" आताच बडबडून गेला.

मनोहर.

*P. S. (Last)…after all I may marry* सुमति *before the end of the term*—अरे ती एकसारखी रडते ना!

मन्या.

---

## पतिपत्नी निवड ५

" श्री, एऽ श्री ! " अशी जोराने हाक मारीत विनायकने श्रीनिवासच्या खोलीचें दार उघडलें. आंत कोणीच नव्हतें. तो पुन्हा हाक मारणार तोंच जवळच्या न्हाणीघरांतून गाण्याची लकेर ऐकूं आली—

'ओऽ चले नहि जाना, ओऽ ओऽ चले नहि जाना'

श्रीनिवासचाच आवाज ! त्याचा आवाज मूळचाच गोड होता नी त्याचें गाणें विनायकाला नेहमीच आवडे. पण आताच्या लकेरींत त्याला जरा विशेष उल्हास आहेसें वाटलें. एक दोन मिनिटें तो ऐकत राहिला; नंतर त्याचें लक्ष सहज शेजारच्या टेबलाकडे गेलें. त्यावर दोन आकर्षक रंगाचीं पाकिटें, वर पत्ता लिहून ठेवलीं होतीं. वरच्याच पाकिटावरचा पत्ता पाहून तो एकदम दचकला : " To, Miss Prema Bhave. " खिशांतली तपकीर काढून एक चिमूट त्याने नाकांत टोसली. त्याला जणूं काय एकदम स्फूर्ति झाली. योग्यायोग्यतेचा क्षणभरहि विचार न करतां स्वारीने पत्र उघडून त्यावर भरकन नजर फिरवली :—

" सप्रेम नमस्कार वि. वि.—सुट्टींत तुझ्याकडे यायचा विचार नक्की झाला. उद्या कॉलेजचा शेवटचा दिवस. उद्या रात्रीं निघून सूर्योदयाला तेथे हजर होतों. स्टेशनावर याल ना ?

तुझा
श्रीनिवास

त्याने दुसरें पत्र उघडलें.

" ती. सौ. आईस सा न. वि. वि.

तुला पूर्वीं कळविल्याप्रमाणें या सुट्टींत मी प्रवास करणार आहें. विद्यार्थी दशेंतच जरा मजा करायची नाही तर केव्हा ग ? आई, रागावूं नकोस हं ! सुट्टी संपण्यापूर्वी येऊन जाईन मी दोन दिवस तुझ्या हातचा स्वैपाक खायला. तुझा हात पोटांत गेल्याशिवाय कां मला चैन पडणार आहे ? काही नाही दिलंस तरी भरलीं वांगीं नी वालाची उसळ मात्र दिल्याशिवाय राहणार नाहीसच, खरं ना ?

तुझा
श्री "

पत्रवाचन संपल्यावर त्याने तीं जागच्या जागीं नीट ठेवलीं. मग तो एकदम बाहेर गेला नी दहा मिनिटांनी परत आला.

" हं, काय ? ठरलं ना मग तुझं या सुट्टींत माझ्या बागायतीकडे यायचं ?" आंत येतांच तो विलक्षण उत्साहाने म्हणाला. " काय ? दिली ना परवानगी आईनं ? कां नाही ? उत्साहांत दिसतो आहेस ! तेव्हा तूं येणारच. बरं झालं बुवा."

आरशासमोर उभा राहून श्री आपले केस काळजीपूर्वक नीट करीत होता. ४।५ मिनिटें गेलीं तरी त्याची केशभूषा संपेना नी उत्तरहि येईना.

"मग काय? ठरलं ना! बोलत कां नाहीस?" विनायकाने पुन्हा विचारलें.

"छे रे, कुठली परवानगी मिळायला आईकडून!" असें म्हणून त्याने जरा वर पाहिलें, तों टेबलावरील पत्रांचें प्रतिबिंब त्याला आरशांत दिसलें. शेजारच्या खुर्चीवरील टॉवेलने तोंड पुसण्याचें निमित्त करून तो टेबलाजवळ गेला व तीं पत्रें त्याने आपल्या खिशांत चटकन कोंबलीं.

"मग काय, तूं घरींच जाणार म्हणतोस!"

"हं. म्हणजे—"

"म्हणजे काय?"

"तसं कांही नाही. म्हणजे जायला पाहिजे." असें म्हणून तो कपडे चढवूं लागला. मनाप्रमाणें पोषाख व्हायला त्याला आणखी दहा मिनिटें लागलीं. "काय लेकाचे हे नोकर—कामचुकार अगदी" असें पुटपुटत खोलींतल्या जिनसांवरून तो टिचकीने धुरळा झाडूं लागला.

"मग काय, नाहीच येणार म्हणतोस? ठरला निश्चय?" फाजील आर्जवी स्वरांत विनायकाने विचारलें.

"ठरलं. गेलंच पाहिजे मला."

विनायकाने मोठ्याने "हूं" म्हटलें व तपकिरीच्या डबींतली एक मोठी चिमूट घेऊन नाकांत ठोसली. अर्थात त्यांतली थोडीशी विनायकाच्या स्वच्छ चादर घातलेल्या बिछान्यावर सांडली.

"अं, you dirty fellow! शुद्ध नांगऱ्या आहेस." श्री ओरडला.

"नाही कोण म्हणतो? आहेंच मुळी. फक्त उच्च दर्जाचा नांगऱ्या असेन कदाचित्!"

"वारे ऐट! तो कसा कार्य?"

"तुझ्यासारख्या चोखंदळ माणसाचं डोकं चांगलं नांगरून साफ करणारा. तोंपर्यंत माझं डोकं चांगलं साफ करून घेतों." असें म्हणून तो तीन मजली हसला व त्याने पुन्हा एक चिमूट बोटांत घेतली.

"ए बाबा, माझ्या बिछान्याजवळून आधी दूर हो, नी तें तुझं नांगरण्याचं काम बाहेर जाऊन कर." श्रीनिवास चिडून ओरडला व चादर साफ करूं लागला.

"चालूं दे तुझी साफसूफ. एवढी ऐट नी नीटनेटकेपणा करण्यांत जीव ओतीत असतोस तें काय एखादं फुलपाखरूं पकडण्याच्या—"

"Shut up! nonsense." श्री चिडला.

"बरं बाबा; चल एकदाचा बाहेर कुठे तो." तो बाहेर पडला. श्रीनिवासनेहि खोलीला कुलूप ठोकलें व तो निघाला.

"चल. एखादा चहाचा कप ढोसूं." विनायक म्हणाला.

"नाही. मला पत्रं टाकायचीं आहेत आताच."

"मग? ती हॉटेलजवळच तर पेटी आहेना."

"नको. पोष्टांतच टाकणार आहें."

"असं! जरा महत्त्वाचीं दिसताहेत. जा बाबा पोष्टांत." असें म्हणून जलद चालणाऱ्या श्रीनिवासच्या पाठमोऱ्या आकृतीकडे एक दोन मिनिटें त्याने टक लावून पाहिलें. नंतर एका नवीन स्फूर्तीने उसळल्यासारखें करून त्याने तपकिरीची एक चिमूट बोटांत धरली व त्याच स्थितींत विचारमग्न होऊन आपल्या हॉस्टेलकडे तो निघाला.

—२—

+ + + + + पूरच्या प्लॅटफॉर्ममध्ये गाडी हळूहळू शिरत होती. विनायकाने खिडकींतून डोकें बाहेर काढलें. एका दृष्टिक्षेपांत प्लॅटफार्म न्याहाळून घेतला. चटकन आपली पिशवी व लहानसा होल्डऑल उचलला व चालत्या गाडींतून उडी मारली, ती नेमकी प्रेमाताईच्या पुढयांतच.

"अं ? तूं कसा बाई आलास ? अन् —"

"म्हणजे ? वहिणीकडे यायला भावाला आमंत्रण लागतं वाटतं ? आणि तें "अन्" म्हटलंस तें काय ?"

• "तसं नाही रे; माझा एक मित्र येणार होता म्हणून आलें होतें स्टेशनवर."

"असं होय ? मला वाटलं तूं मलाच घ्यायला आलीस."

"हो, मला काय स्वप्न पडलं होतं, तूं येणार म्हणून ?"

"भावावर जर तुझं प्रेम कायम असतं तर तुला झाली असती तशी प्रेरणा."

"इश्श, म्हणजे प्रेम नाही की काय ?"

"असेल की; पण कालमानाप्रमाणं स्त्रियांचं प्रेम जरा इकडे तिकडे फाकलं ना ?"

"चल्, चावट कुठला."

"हें पहा, मी आपला नांगऱ्या बैल आहें. अगदी नाका-समोर सरळ जायचं एवढं मला माहीत. बरं, पण तुझा तो मित्र— ?"

"तेंच तर पहातेंय" इकडे तिकडे भिरिभिरी पाहत ती. म्हणाली, "बघूं या तरी." तुफान गर्दींतून रस्ता काढीत दोघेही एका डब्याजवळ थबकले.

"कां हो, असे दाराजवळ घोटाळतां काय ? उतरा ना."

• उतरूं की नको अशा मन:स्थितींत, खाली सामानाकडे पहात असलेल्या श्रीनिवासकडे पाहत प्रेमा उद्गारली. त्याचा डबा बराच मागे होता. खिडकींतून तो बाहेर पाहतो तों प्लॅटफॉर्मवर ही जोडी उभी. श्रीनिवासने शेवटीं सामान खाली काढायला हमालाला सांगितलेंच व तो खाली उतरला.

"हा माझा मावसभाऊ विनू—शेतकी कॉलेजांत आहे." प्रेमा एकदम म्हणाली.

"नमस्कार गुरु." जरा दूर उभा असलेल्या विनायकाने हसत पुढे होऊन श्रीनिवासला गदगदा हलवलें.

"म्हणजे ? तुमची ओळख आहे वाटतं ?" प्रेमा आश्चर्याने म्हणाली.

"ओळख नव्हे चांगली मैत्री आहे. का रे खरं ना ?"

"होहो; आहे तर" श्रीही जरा हसत म्हणाला.

"मग का रे इतके दिवस बोलला नाहीस कधी ?"

"अन् मला तरी कधी सांगितलं यानं की तूं—तुम्ही याची बहीण म्हणून ?"

"बाकी तें त्याच्या स्वभावाप्रमाणेच झालं म्हणा. दुसऱ्या-विषयीं खूप बोलेल, पण स्वत:विषयीं, अं हं-" प्रेमा उद्गारली—थोडी थांबली व लगेच म्हणाली,

"पण हा येणार आहे म्हणून तुम्ही कसं—"

"अग पण मी इथं उतरणार आहे हें मला तरी कुठं अगोदर ठाऊक होतं ? मी चाललों आहें आमचं नांगरण्याचं काम करायला. सहज गाडींतून डोकावलं तर तूं दिसलीस. मग बहिणीला ओलांडून पुढे जाणं भावाला शोभलं असतं कां ? तूंच सांग."

"हो, ठाउक आहे बहिणीविषयी किती ओढा आहे तें. दहा वेळां बोलवावं तेव्हां एकदा कधी येतोस. त्या कालिंदी-ताईकडे मात्र—"

"ए पाखरा, पुरे आता. या खेपेस इतका इथं रहाणार आहें की तूं कंटाळशील. बाकी आताच कंटाळा आलेला दिसतोय. खरं की नाही रे श्री ?" असें म्हणून श्रीनिवासकडे त्याने एक कटाक्ष टाकला. त्याचा चेहेरा उतरला होता. पण स्वतःला सावरून तो म्हणाला, "हो की, तसं दिसतंय खरं थोडसं."

"बरं बरं. चला आता घरीं." प्रेमा फणकाऱ्याने म्हणाली.

"राग अगदी नाकाच्या शेंडयावर सदा हजर. तुला नाही असं वाटत श्री ?"

"हं, जरा–" श्री घोटाळला.

"घुटमळतोससा कबूल करायला ?" असें म्हणून चालतां चालतां त्याने श्रीनिवासच्या खांद्यावर थाप दिली.

तिघेही स्टेशनवरून घरीं यायला निघाले. प्रेमा स्वतः मोटार हाकीत होती. तिच्या मोहक आकृतीकडे श्री सारखा बघत होता. त्या दोघांकडे विनायक आलटून पालटून कटाक्ष टाकीत होता व मधूनच तपकिरीची चिमूट नुसती बोटांत धरून तो विचारमग्न होत होता.

  

"आता अगोदर चहा बोलाव बुवा. चहा ढोसल्याशिवाय कांही या श्रीच्या चेहऱ्यावर तरतरी येणार नाही." सामान आंत आल्यावर दिवाणखान्यांतील कोचावर स्वतःला अस्ताव्यस्त फेकून देऊन विनायक हसत म्हणाला.

"म्हणजे? तरतरी नसायेला झालंय काय मला!"

"तो चेहेरा पहा जरा आरशांत, कसा पडला आहे तो."

"बरं, असूं दे. हरिराम–ए हरिराम–हरिराऽऽम!" पंचमांत स्वर चढवून प्रेमाने सैपाक्याला हाक मारली.

"त्याला ताप आलाय म्हणून घरीं निघून गेलाय तो बाई." भिमा मोलकरणीने दारांत येऊन सांगितलें.

"जा मेल्यांनो, तो किसन कुठं आहे?"

"बहिणीच्या लग्नाला गेलो म्हणून निरोप आलाय."

"नक्को त्या वेळेला यांचीं लग्नं नी ताप उभीं राहतात." तिच्या रागाचा पारा वर चढला आहे हें पाहून भिमा परत जात होती तोच "चालली कुठं? केरसुणी घेना इथं फिरवून." असा तिला हुकूम सोडून प्रेमा आंत निघून गेली. दोघेही तिच्याकडे पहात राहिले. भिमा हाती केरसुणी घेऊन जी आली ती त्यांचा यत्किंचितही मुलाजा न ठेवतां सतरंजीवर सपासप केरसुणी मारूं लागली. खरकटीं भांडीं तिने नुकतीच घासलीं होतीं. तिच्या लुगडयावर नी हातावर राख तशीच होती. तिचे केस पिंजारले होते. सकाळीं झोपेतून उठली ती तशीच कामावर आलेली दिसत होती. तिच्या एकंदर अवताराकडे नजर जातांच श्रीनिवास "शी" म्हणून उठला नी व्हरांडयांत जाऊन उभा राहिला.

"काय रे उकडतं आहे वाटतं?" त्याच्या मागोमाग येऊन विनायक म्हणाला.

"कां?"

"नाही–'शू' केलंस नी बाहेर आलास म्हणून विचारलं."

"'शू' नाही 'शी'" श्रीचा आवाज जरा चढला.

"कांही कां असेना! जरा उकडतंयसं दिसतं एवढं खास." विनायकाच्या डोळ्यांत जरा मिस्किलपणाची छटा येऊन गेली.

श्रीनिवासने नुसतें "हूं" केलें व समोर पहात उभा राहिला. आंतून टेबल खुर्च्या सरकवण्याचा निनाद ऐकूं येत होता.

"कायरे, चहा मिळणार आहे की नाही ?"

"पाहूं या." विनायक बेफिकीरपणें म्हणाला.

"म्हणजे काय ?"

"पाह्यचं काय मिळतंय तें. पहायचं नी विचार करायचा एवढं काय तें माझ्यासारख्या नांगऱ्याला कळतं." एवढं बोलून विनायकाने तपकिरीच्या डबीवर टिचकी मारली व गंभीरपणें एक चिमूट घेऊन जास्तच गंभीरपणें ती ओढली.

"अऽहा, काय मजा वाटते, कशी अगदी मेंदूला जाऊन भिडते" असें म्हणून त्याने श्रीकडे नजर टाकली. तो अस्वस्थ व विचारमग्न दिसला.

"बाई म्हणतात, तोंड बिंड धुवा." भिमा एकदम येऊन गरजली.

"पाणी ठेवलंय ना ?" विनायकने हसत विचारलें.

"तें आहे ना न्हाणीघरांत टाक्यांत." असं म्हणून ती चालती झाली.

"चल रे श्री टाक्यांत. नाही तरी थंड पाण्याच्या हबक्यानं थंडीच्या दिवसांत जरा तरतरी वाटते."

तोंड धुवून दोघे परतले. श्रीची नजर टेबलाकडे गेली. धुरळ्याचा थर त्यावर छान पसरला होता.

"शी, शी, काय ही घाण." तो एकदम ओरडला.

"मघ बघतोस काय ? मार टिचक्या नी कर साफ. दिवसभर टिचक्या मारीत बसलास तरी पुरून उरेल. बाहेर जायलाच नको. घरींच भरपूर व्यायाम." असें म्हणून विनायक तीन मजली हसला.

"हसतोस काय ?"

"मग काय करूं? माझी तपकीर जरा कुठं तुझ्या खोलींत सांडली—" त्याचें बोलणें अपुरेंच राहिलें. कारण चहाचा ट्रे घेऊन भिमाबाई व पाठोपाठ प्रेमा आंत आली. त्याच धुरळ्यावर ट्रे ठेऊन भिमा गेली.

"हं ढोस बाबा चहा." विनायकाने श्रीकडे नजर टाकली. तो प्रेमाकडे पहात होता. स्टेशनवर ज्या पोषाखांत ती आली होती तोच तिच्या अंगावर होता. स्टेशनवर त्याला ती किती सुंदर वाटली. त्या सौंदर्याचें मी वर्णन कांही करत नाही. चंद्र, कमल, चाफेकळी. हरिणाचे डोळे सर्व कांही त्या वर्णनाकरतां उपयोगी पडले असते. शिवाय सौंदर्यप्रसाधनाचे आधुनिक उपाय अमलांत आणले होतेच. तिच्या गौरवर्णाला ती पांढरी, जरी-किनारीची साडी विशेप उठून दिसत होती. तिने खुर्ची ओढली व ती चहा गाळूं लागली. श्रीनिवास जरा खुर्चीत येऊन तिच्याकडे बघत आहेसें पाहून विनायक एकाएकी स्फूर्तीने प्रेमाकडे वळून म्हणाला. "कुठं घेतलीस ही साडी? मघापासून विचारणार होतों बघ. बनारसी दिसतेय!" कौतुकाचा आव आणून तो जवळ गेला व साडीचा पदर त्याने एकदम वर उचलला तों चुलीवरचें पोतेरें त्यावर व्यवस्थित पसरलेलें त्याला दिसलें. त्याने लगेच खाली मान केली. साडी किती छान आहे. प्रेमाला ती किती छान दिसते, तिची कपडयांची निवड किती छान असते, वगैरे मुद्यांवरचें त्याचें प्रवचन ऐकून प्रेमा खूष दिसत होती. श्री मात्र एक शब्द न बोलतां समोरच्या कपाकडे पहात होता.

प्रेमाने चहा ओतला. एक घोट घेतांच श्रीचा चेहरा कसा-तरी झाला. तो विनायकाच्या नजरेंतून सुटला नाही. लगेच त्यानेही एक घोट घेतला नी हर्षातिरेकाने तो म्हणाला "वा, प्रेमाताई, छान."

"काय रे ?"

"काय म्हणजे ? चहा किती सुंदर केला आहेस ! मला कांही चहा इतका आवडत नाही. पण इथं असे तोंवर आपण चहाच घेणार. पण तुझ्याच हातचा बरं का ! अग, त्या चहाबाजाला घाल आणखी."

"छे, छे, मला नको आता जास्त." श्री घाबरून म्हणाला.

"असं कुठं झालंय् !" विनायकाने आग्रहाने म्हटलें.

"तेच तर. मला ठाऊक नाही की काय, वेळेला तीन कप लागतो तो." जितक्या लाडिकपणाने हे बोलली तितक्याच लाडिकपणाने तिने श्रीनिवासचा कप भरला. एकामागून एक कप घेत विनायकाने चहाची स्तुति अखंड चालू ठेवली. अर्थात् तो चहा पिणें श्रीनिवासला भाग पडलें. तो काढा कसाबसा त्याने घशाखाली ओतला.

"खरंच. तुमची मैत्री आहे हे कसं नाही मला कळलं ?" प्रेमाने विचारलें. श्री तोंड उघडणार तोच विनायकाने उत्तर दिलें.

"अग, मी सांगतों तुला—आमच्या दोघांच्या कॉलेजची हॉकी मॅच झाली. त्या वेळीं आपल्या गड्यांना प्रोत्साहन देण्याकरतां ओरडणारी जी एक दुसरी टीम बरोबर जाते ना. तिचा कॅप्टन होतो मी. माझ्या ओरडण्यामुळे यांचे गडी मॅच हरले असा याचा झाला ग्रह. हा लागला माझ्याशीं बाचाबाची करायला. त्या भांडणांत आम्ही एकमेकांवर प्रेम करायला लागलो नी दोन तासांत मित्र झालों."

"भांडणांतून प्रेम ?" प्रेमाने आश्चर्याने विचारलें.

"अग, भांडणांतूनच खरं प्रेम उत्पन्न होतं. गैरसमजाने तें वाढतं—नी विरहांत परिपक्व होतं. हेच खरं प्रेम. बाकीचं सगळं प्रेम उथळ. खरं की नाही श्री ? हें आम्हां नागव्यांचं शास्त्र आहे.

तुम्हांला नाही तें कळायचं." असें म्हणून तो खो खो हसत सुटला. तीं दोघेंही त्याच्याकडे पाहत राहिलीं.

"पण यांच्याविषयी तूं केव्हाही माझ्याजवळ उल्लेख केला नाहीस हें कसं?" थोडया वेळाने श्रीने विचारलें.

"अरे, तें सांगायला तूं फुरसत देशील तेव्हा ना?"

"म्हणजे?" प्रेमाने उत्सुकतेने प्रश्न केला.

"आमची मैत्री वाढूं लागल्यापासून हाच एकसारखा तुझ्या-विषयीं बोलायचा—म्हणजे आदरानं नी कौतुकानं बरं का. मग सांगणार केव्हा याला? शिवाय स्वत:विषयीं भी कमीच बोलतों असं स्टेशनवर तूंच नाही का म्हणालीस? यापेक्षा आणखी खात्रीलायक पुरावा कोणता? सांग?"

प्रेमाचा चेहेरा गुलाबी झाला.

"आता कां नाही बोलत? बाकी बरं झालं, आमच्या श्रीला बहीण नव्हती ती मिळाली. अगोदरच तो स्वभावत: टिपटॉप नी तुझ्या सहवासांत त्याचं एस्थेटिक सेन्स चांगलंच वाढलं की! असा mutually influence करणारा स्नेह क्वचितच पहायला मिळतो. कित्ती छान आहे ग ही तुझी साडी!" कौतुकाने पदर उचलून त्या पोतेऱ्याचें दर्शन त्याने श्रीला पुन्हा एकदा अगदी सहज घडवलें. प्रेमाच्या चेहेऱ्यावरील गुलाब आणखीनच उमलले. श्री गंभीर झाला व खाली बघूं लागला. दिवाणखान्यांत एकदम शांतता पसरली.

"काय ग? अण्णासाहेब कुठं आहेत?" वेळींच शांततेचा भंग करून विनायकाने विचारलें.

"खरंच, अजून उठले नसावेत. रात्रीं बराच वेळ वाचीत बसतात. काल जरा जास्तच जागले बाई."

" बाकी अण्णासाहेबांचा सहवास आमच्या श्रीला खूप आवडेल. यालाही आहेना विविध वाचनाचा नाद."

" कां ? म्हटलं होतं की नाही मी अस्संच तुम्हांला ! " श्रीकडे पहात वडिलांविषयींच्या अभिमानाने ती म्हणाली.

" बाई, पाणी काढलंय, न्हायचं आहे ना ? " भिमाबाईने मधेच वर्दी दिली.

" खरंच की, आलें हं. अन् त्या राधाकाकूंना सांग, म्हणावं हरिराम नाही, तर दोन दिवस सैपाकाला याच. "

" अन् हें बघ याच्या दाढीकरतां तपेलींत गरम पाणी आण." विनायकाने हुकूम सोडला खरा; पण श्रीच्या डोळ्यासमोर थोड्या-वेळांपूर्वीचे भिमाचे हात नाचू लागले. " नको, मीच आणतों—कुठं आहे पाणी ? " तो घाईने उठून जाऊं लागला.

" हें काय ? आणील ना ती. " प्रेमाने लाडिकपणाने म्हटलें. नी तो नाइलाजानें खाली बसला. प्रेमा न्हाण्याकरितां निघून गेली. भिमाने पाणी आणून दिलें. ती जातांच जरा चिडूनच श्रीने विचारलें,

" एवढा सोसासोसानं तो चहा रे कशाला ढोसलास ? "

" वाऽ, प्रेमाताईनं एवढ्या प्रेमानं केला, कौतुक नको का करायला ? "

" अरे, पण तो चहा होता की काढा ? "

" हें पहा मी आपला भोळा शंकर आहें. बहिणीवरील प्रेमाकरितां शंकराप्रमाणं मी कंठीं विषसुद्धा धारण करीन. "

" घे बाबा, बहीण पडली तुझी ! "

" अन् तुझी नाही का ? कायरे, उत्तर देत नाहीस मला? तर वाटलं की माझ्यापेक्षाहि तुमचं प्रेम विशेष आहे. "

" अंऽ- हो आहेना. प्रेम नसायला काय झालं ! पण तो काढा-". त्याने वाक्य अर्धवटच सोडलें व तो दाढी करायला बसला. एक तीक्ष्ण नजर विनायकाने त्याच्याकडे टाकली नी "हं" असें म्हणून एक मोठा श्वास टाकला.

" काय झालं रे ? " मागे वळून श्रीने विचारलें.

" कांही नाही—जरा तपकीर घशांत गेली."

" मग फेकून दे. कशाला ओढतोस ?"

" फेकीन रे बाबा, फेकीन. वेळ येऊं दे ती. थांब प्रेमाताईचं न्हाणं कुठवर आलं तें पहातों." असें म्हणून तो निघून गेला. श्रीनिवासने दाढी सुरू केली. नेहेमी सफाईने दाढी करणारा तो, पण आज मात्र त्याचा चेहरा तीन ठिकाणीं कापला गेला. एकदाची संपली दाढी. वरती त्याने स्नो वगैरे लावलें. दाढीचें सामान गोळा करून तो उठणार तों विनायक घाईघाईने आंत आला नी " श्री, चल पाणी काढलं आहे तुझ्याकरतां. स्नान करून घे. तुझं झालं की मग मी. चल, न्हाणीघर दाखवतों " असें म्हणून तो त्याला न्हाणीघराकडे घेऊन गेला. श्रीनिवास आंत जातांच त्याने दार ओढलें व तितक्याच घाईने तो दिवाणखान्यांत येऊन ऐटींत वर्तमानपत्र डोळ्यासमोर धरून बसला. श्रीने कपडे खुंटीवर ठेवले व मागे बघितलें मात्र, तों त्याचें अंग एकदम शहारलें. समोर मोरीच्या तोंडापासून मागे पाणी साचलेलं-कारण मोरी तुंबली होती. साचलेल्या पाण्याजवळच सोडलेलें ओलें लुगडें व टॉवेल पडलेला. त्याच्याजवळच केसांच्या गुंतावळी नी नाकांतील इस्टेट. एकदम कपडे घेऊन तो बाहेर पडला व दिवाणखान्यांत आला; कपडे सूटकेसवर फेकून दिले नी खुर्चीत दबकन बसला. वर्तमान-पत्राआडून विनायकाने हें सर्व पाहिलें. मिस्किलपणें तो हसला. श्रीच्या बसण्याच्या आवाजाने जणूं काय वाचनांतून जागें झाल्या-

सारखा आत्र आणून त्याने गंभीरपणें विचारलें, " अं ! इतक्यांत कसं झालं स्नान ?"

"मी आज स्नान करीत नाही."

"कां रे ! बरं नाही की काय !"

"तसं नाही. जरा अंग शहारल्यासारखं झालंय."

"अं, रात्रीच्या गाडींतल्या त्रासामुळं वाटत असेल तसं. स्नान केल्यानंच उलटं बरं वाटेल."

"मी नाही करीत."

"बरं मीच करतों. पाणी निवून जाईल."

"अरे, पण दाढी करशील की नाही ?"

"अं, मला कुठं इतकी शान करून एखादी परी पटकावायची आहे ? बरा आहे मी असाच नांगऱ्या." असे म्हणून व धोतररुमाल घेऊन तो चालता झाला. हा फटकारा ऐकून, तपकिरीने मेंदू हलावा तसे श्रीला वाटले. तो स्वस्थ बसून राहिला. थोडया वेळाने विनायक व प्रेमा आली.

"हे काय ? स्नान नाहीच कां केलं !" प्रेमाने चौकशी केली.

" जरा बरं वाटत नाही " त्रासिक स्वरांत त्याने उत्तर दिलें.

"तें कांही नाही. स्नान केलं म्हणजेच बरं वाटेल." तिच्या बोलण्याला विनायकाने दुजोरा दिला. थोडया वादानंतर तो न्हाणीघरांत गेला. पाहतों तों न्हाणीघर त्याला पाहिजे तसें स्वच्छ. तें पाहून त्याला प्रसन्न वाटतें न वाटतें, तोंच उदासही वाटलें. कां ? तें त्याचें त्याला कळेना. हें काम विनायकाचे असावें याबद्दल मात्र त्याला शंका नव्हती.

—३—

“श्री, चल, तुला प्रेमाताईचा बंगला दाखवतों.” असें म्हणून विनायक त्याला बंगल्याभर फिरवूं लागला, तेव्हा ठिकठिकाणचीं जाळीं व केर पाहून त्याला विचारल्याशिवाय राहवलं नाही. “विनू, इथं काय नोकर मिळतच नाहीत की काय?”

“छट्, मिळतात तर. टिकत मात्र नाहीत. माझ्या करड्या अंमलामुळे टिकत नाहीत असं प्रेमा अभिमानानं म्हटल्याचं आठवतं बुवा.” बोललेलें ऐकलें पण उमगलें नाही म्हणजे जसा माणसाचा चेहेरा होतो तसा श्रीनिवासचा चेहेरा झाला. विनायकाने पाहिलें नी तिकडे दुर्लक्ष केलें. तो त्याला एकदम प्रेमाच्या खोलींत घेऊन गेला. आरशासमोर उभी राहून ती तोंडाला पावडर लावीत होती. अंजिरी रंगाची साडी तिला विशेष खुलून दिसत होती. क्षणांत श्री मोहित झाला. पण उगीच बघत रहाणे बरें दिसत नाही असें वाटून बसण्यासाठी त्याने खुर्चीकडे नजर टाकली. तिजवर विविध रंगांच्या चारपांच उंची साड्या अस्ताव्यस्त पडल्या होत्या. तो पलंगाकडे वळला तों त्यावर धोब्याकडून आलेले व त्याला देण्याचे कपडे एकमेकांशीं गट्टी करून बसले होते. तिचा होल्डऑल जवळच जमिनीवर आ वासून पसरलेला दिसला. ड्रेसिंग टेबलवर पावडर पिस्करलेली होती व आरशावरील धुळीमुळे त्यांत तोंड दिसणें मुष्किल होतें. त्या दोघांना पाहून प्रेमाने प्रसन्न हास्य करीत म्हटलें, “बसा ना” नी स्वत: साड्यांच्या ढिगावर बसली.

तोंड फिरवून श्रीनिवास खोलींतील फोटोंकडे पाहूं लागला.

विनायक तपकिरीच्या डबीवर टिचक्या मारूं लागला.

“हें काय! बसा ना.” तिने पुन्हा लाडिक आग्रहाने म्हटलें.

“चल, यांची अण्णासाहेबांशीं ओळख करून देऊं.”

" वा ! छान ! चला तर त्यांच्या स्टडींत. " प्रेमा उल्हासानें पुढे झाली.

श्रीने हळूच एक श्वास सोडला व तो मागोमाग गेला.

—४—

" या, हेच कां तुमचे मित्र ? " मुलीकडे पाहून अण्णासाहेबांनी विचारलें व उत्तराची वाट न पाहतां ते स्वतःच उल्हासाने बोलूं लागले.

" हा तत्त्वज्ञानाचा इतिहास वाचीत होतों. फार मजेदार आहे बरं कां ? " असें म्हणून त्यांनी प्लेटोच्या तत्त्वज्ञानापासून सुरवात केली. कांही वेळपर्यंत त्यांचें बोलणें श्रीनिवासला मजेदार नी उद्‌बोधक वाटलें. त्यांच्या ज्ञानाविषयी विलक्षण आदरही वाटला. पण पुढे दोन तास झाले तरी त्यांचें बोलणें संपेना, तेव्हा तो अस्वस्थ झाला. बारा वाजून गेले तसे त्याच्या पोटांत कावळे ओरडायला लागले. कांही वेळाने मैत्रिणी आल्या म्हणून प्रेमा उठून गेली. लगेच कांही तरी निमित्त करून विनायकही तेथून पळाला. बऱ्याच वेळाने पानें वाढलीं म्हणून तो सांगायला आला तेव्हा त्या तत्त्वज्ञानाच्या इतिहासाची गाडी हेगेलपर्यंत आली होती. पाठोपाठ प्रेमाही आली.

" स्नान करतां ना अण्णासाहेब ? पानं तयार आहेत. " असें तिने म्हटलें तेव्हा ते खेदाने उठले व स्नान करायला गेले.

" खरंच, किती माहिती आहे अण्णासाहेबांना, नाही ? " विलक्षण भक्तीचा आव आणून विनायक म्हणाला. उत्तरादाखल श्रीनिवासने कपाळाचा घाम पुसला. विनायकाला त्याची दया आली. " काय प्रेमा ! जेवायचं तयार आहे ना ? "

"हो केव्हाच. पण मी मुद्दामच नाही हाक मारली अगोदर. आज अण्णा खूपच रंगले होते. यांना अशी संधि मिळायची नाही लौकर, म्हणून मुद्दामच नाही हाक मारली जेवायला."

"खरंच तर; श्री देखील रूप रंगला होता ऐकण्यांत. अशी संधि मिळत नाही अगदी. आता इथं आहेस तोंवर होऊं द्या तुमच्या दोघांच्या बैठकी."

श्रीनिवासचा चेहेरा गोरामोरा झाला उत्तरादाखल तो कांही बोलणार तों न्हाणीघरांतून धोतर नेशीत नेशीत अण्णासाहेब जे बाहेर आले ते पुन्हा हेगेल जिभेवर घेऊन. "बरं का, अहो, काय तुमचं नांव ?"

"श्रीनिवास देशपांडे." संधि पकडून त्यांना विनायकाने नांव ऐकवलें.

"हें पहा मिस्टर श्रीनिवास, या हेगेलचं असं आहे—"

"अण्णा, अन्न निवून चाललं तिकडे." विनायक पटकन म्हणाला.

"हो हो–चला. तिथंच बोलूं."

श्रीनिवासच्या पोटांतील कावळे एकदम ओरडण्याचे थांबले. त्याला एकाएकी वाटलें, तोंडावर पांघरुण घ्यावें नी संध्याकाळ-पर्यंत निजून रहावें. पण शिष्टाचार आड आला. मंडळी पानावर बसली नाहीत तोंच अण्णासाहेबांनी हेगेलला तिरिमिरीने हात घातला. बाकीच्यांचें सर्व जेवण आटोपलें तरी हेगेल त्यांच्या पहिल्या भातावरच हेलकावे खात होता. प्रेमाने बरेच वेळां आठवण केल्यावर कुठे ते पोळीवर आले व मग कसें तरी जेवण संपलें. आंचवल्यावर आपल्या खोलीकडे धूम ठोकण्याच्या विचारांत श्रीनिवास होता. तोंच अण्णासाहेबांनी आरोळी ठोकली, "अहो श्रीनिवासराव, आलं का लक्षांत ? हेगेल म्हणतो ना तें

आमच्याकडचे तत्वज्ञानी अगोदरच म्हणत आले आहेत. चला आमच्या स्टडीकडे, तुम्हाला references वाचून दाखवतों." गेला बिचारा मागोमाग.

"मी विडे आणतों हं." म्हणून विनायक मागे राहिला. भिमाबाईबरोबर त्याने विडे पाठवून दिले व आपल्या खोलींत जाऊन जो छान झोपीं गेला तो दोन तासांनी जागा झाला; कारण त्याने तसा गजरच लावून ठेवला होता. तो तडक सैंपाकघरांत गेला. चहाचें आधण चुलीवर ठेवलें व लगेच अण्णासाहेबांच्या स्टडीकडे गेला. शंकराचार्यांचें नांव त्याला उंबरठयावर ऐकूं आलें. अद्याप टिळकांच्यावर गाडी यायला किती दिवस लागतील याचा त्याला अंदाज आला.

"चल श्रीनिवास, चार वाजले. चहा वाट पाहतो आहे." आंत येऊन तो म्हणाला. "चार वाजले अं ? वाऽ ! मजेंत वेळ गेला. हे मिस्टर श्रीनिवास मोठे बुद्धिमान आहेत बरं का." सहा तासांत आपण एकदाही तोंड उघडलें नव्हतें याची आठवण येऊन व आपल्या बुद्धीला दिलेलें हें सर्टिफिकेट पाहून त्या वेळच्या मनस्तापांतही श्रीनिवासला हसूं आलें. पुन्हा बोलण्याकरितां अण्णासाहेबांनी तोंड उघडण्यापूर्वींच विनायक त्याला ओढून घेऊन गेला. दुपारचा चहा अण्णासाहिब घेत नसत म्हणून ते मागेच राहिले. "किती दुष्टपणानं मला एकटयाला तिथं सोडून गेलास रे ?" श्री चिडून बोलला.

"यांत कसला दुष्टपणा ? मला वाटलं, प्रेमाताईच्या म्हणण्याप्रमाणं तुला अण्णासाहेबांचा सहवास खूपच आवडेल."

श्रीनिवास यावर कांही तरी विकार व्यक्त करणार होता. पण "प्रेमाताईच्या म्हणण्याप्रमाणं" या शब्दांनी त्याला एकदम

रोखलें–धरलें. मन शांत होण्याऐवजी चीड वाढली. तो स्तब्ध झाला. त्याच्या चेहेऱ्यावरील विकाराची विनायकाने नोंद केली.

" हें पहा श्री ! मी दुष्ट असतों तर जेवायला बसण्यापूर्वी स्टडींत चोरून जाऊन घड्याळ एक तास पुढे करून ठेवलं नसतं."

श्रीच्या डोक्यांत एकदम कसला तरी प्रकाश पडला. तो थोडासा हसला व म्हणाला " खरंच या वेळीं चहा मिळेल तर—"

" पांच मिनिटांत देतों बघ. सकाळीं मैत्रिणी आल्या होत्या ना ? त्यांच्यापैकी एकीच्या घरीं बारसं आहे तिकडे गेली आहे प्रेमाताई. सैपाकघरांत आता आपलंच राज्य आहे."

श्रीनिवासने एक दीर्घ निश्वास टाकला.

" कारे ? उसासा टाकलास ? "

" कांही नाही. सकाळच्या चहाची आठवण झाली."

त्याच्या स्वरांतील कोरडेपणा विनायकाच्या लक्षांत आला. तो स्वतःशींच हसला व त्याला स्वयंपाकघरांत घेऊन गेला. चहा यथेच्छ प्याल्यावर ते आपल्या खोलींत आले. श्रीनिवासने आराम-खुर्चीवर अंग फेकलेले विनायकाने पाहिलें. तो मुकाट्याने खिडकी-जवळ गेला नी बाहेर डोकावून पाहतो तो राधाकाकू घरांत शिरताहेत. क्षणभरच, त्याचे डोळे मिस्किलपणे हसले. पाऊल न वाजवतां तो खाली गेला.,

" हें पहा काकू ! आज स्वैपाक नको म्हणून प्रेमाताईनं बाहेर जातांना सांगितलं आहे. त्या गेल्या आहेत बारशाचं जेवा-यला, नी आम्हांलाही संध्याकाळीं जायचंय."

" खरं का ? आलें होतें म्हणून सांगा."

" वा, म्हणजे काय ? जरूर जरूर सांगेन." अत्यंत विनयाने त्याने उत्तर दिलें.

  

"या प्रेमाताई, झालं कां बारसं! काय नांव ठेवलं बाळाचं?"

"सांग बरं तूं, काय ठेवलं असेल तें?"

"श्रीनिवास."

"इश्श" म्हणून ती खुर्चींत बसली. तिचे गाल लाल झाले. श्रीनिवास लाजल्यासारखा दिसत होता.

"इश्श काय? माझ्या नांवाची मला विशेष आवड नाही. तेव्हा या मित्राचं प्रिय नांव ओठावर आलं. एकंदरींत श्रीनिवासच ठेवलेलं दिसतंय. काय?"

"जाऊं दे तें. चहा घेतलात की नाही? मेला हरिराम आला नसेल."

"नको जीव ओतूंस. झाला कसाबसा चहा."

"म्हणजे?"

"केला कसाबसा मीच. अरे हो, ती राधाकाकू सांगून गेली, संध्याकाळीं येणार नाही म्हणून."

"झालं! कां पण?"

"सांगितलं खरं कायसं. मी धड ऐकलंही नाही."

"धड ऐकलंही नाहीस?"

"म्हाताऱ्या बायकांचं बोलणं ऐकण्यांत कांही स्वारस्य असतं का? अग, पण तुझा कां चेहरा असा पडला? तुझ्या हातचा सैपाक आता खायला मिळणार म्हणून आम्हांला हर्षाच्या उकळ्या येताहेत इकडे. खरं की नाही रे श्री?"

"हो तर" क्षणिक उल्हासाने श्रीने पुष्टि दिली. प्रेमा गंभीर झाली.

"चल श्री, कपडे कर लौकर. आपल्याला खरेदीला जायचंय ना!" तिच्या गंभीरपणाचा हिशोब न घेतां विनायक म्हणाला व श्रीचा हात धरून त्याला घेऊन गेला.

—५—

बाहेर फिरत असतां श्रीनिवासचा त्रासिक व विचारमग्न चेहेरा विनायकाच्या पूर्णपणें लक्षांत आला होता. तरी पण मोकळ्या हवेंत श्रीनिवासला जरा बरें वाटत होतें. पण फिरून आल्यावर ते घरांत पाऊल टाकतात तोंच आपल्या 'स्टडी'मधून अण्णासाहेबांनी चित्त्याप्रमाणे श्रीनिवासवर फेक घेतली.

"चला श्रीनिवासराव, तो ज्ञानेश्वरीविषयीचा संदर्भ तुम्हांला वाचून दाखवतों."

"प्रेमाताई, ए प्रेमा" अशा अत्यंत लाडिकपणे विनायकाने हाका मारल्या व कसायाच्या हातीं गाय देऊन तो आंत घसरला. नंतर तासाभराने मंडळी एकदाची जेवायला बसली. दुपारच्या उंची पोषाखांतच प्रेमाताई वाढीत होती. तोंडावरची पावडर घामामुळे तिच्या काळ्याभोर केसांवर पसरली की काय असें श्रीला वाटलें. अण्णासाहेबांच्या वक्तृत्वाची दखल न घेतां भुकेलेल्या श्रीनिवासने तोफेच्या गोळ्याप्रमाणे भात तोंडांत फेकण्याचा विचार करून त्याला हात घातला तों काय? एक नवीन प्रकारचें पक्वान्न समोर आल्यासारखें त्याला वाटलें. वरती अक्षता, मध्ये भात व शेवटीं राख असें तें अपूर्व पक्वान्न तो पिस्करूं लागला. एक दोन घास कसेबसे आंत लोटून आमटीच्या वाटींत त्याने हात घातला, तों डाळीबरोबर शिजलेलें झुरळ त्याच्या हातांत आलें. किळस येऊन तें त्याने फेकून दिलें व स्वैंपाकघराकडे तो हताश नजरेने पाहूं लागला. विनायकाची नजर चौफेर होतीच.

"वा वा, प्रेमाताई, तुझी आमटी आज मस्त झाली आहे बुवा. काय अण्णासाहेब!" विनायकाने आरोळी ठोकली.

"वा वा, फक्कड" म्हणून भराभर भुरके मारून त्यांनी वाटी रिकामी केली. प्रेमा लगेच आमटी घेऊन आली.

"हं, अण्णासाहेबांना अगोदर वाढ. भर त्यांची वाटी."

प्रेमाने त्यांची वाटी भरली व ती श्रीनिवासच्या पानाजवळ आली.

"अग, त्याला कशाला. त्याला वावडं आहे तिचं. पहिलीच वाटी पडली आहे. हें ग काय! एवढीशीच दिसते आहे भांड्यांत?"

"अंदाजच आला नाही बाई." उदासपणें प्रेमा म्हणाली.

"अगं चालायचंच. राहूं दे तेवढी तुझ्यासाठी. हें रे काय श्री? उलटी होतेय की काय? मला वाटलंच. सकाळपासून बरं नव्हतं. प्रेमा, तुझ्याजवळ ती अर्धचंद्रगुटिका आहेना? पांच थेंब दे, की थांबेल सगळं." विनायकाने काळजीच्या स्वरांत सांगितलें.

"काय? अर्धचंद्रगुटिका? मला नाही बाई माहीत."

"बरं, माझ्याजवळ आहे. चल श्री खोलींत." असें म्हणून हात धुवून त्याने श्रीनिवासला खोलींत नेलें.

"हें पहा विनू, आताच्या आता सामान बांध. एक मिनिट-भरहि मी इथं रहायला तयार नाही." संकोचाचे सर्व बांध फोडून श्रीनिवास गरजला.

"हें काय भलतंच. ती अर्धचंद्रगुटिका देतों म्हणजे—"

"माझे आई, तुझ्या त्या प्रेमाताईकडून मिळाला आहे मला अर्धचंद्र."

"चूप; बिचारी किती प्रेमळ नी सुंदर आहे. किती वाईट वाटेल तिला तूं गेलास तर."

"ए प्रेमळ भावा, बऱ्यावाइटांच्या सर्व सीमा मी एकदम ओलांडायला तयार आहें—पण इथून आता चल." श्रीनिवास हातघाईवर आलासें पाहून विनायकाने शांतपणें तपकिरीची डबी उघडली.

"आण बाबा इकडे एक चिमूट —"

"अरे पण तुझ्या मतें ही घाणेरडी चीज—"

"असूं दे. तीच या वेळीं मला प्रिय आहे." असें म्हणून त्याने खरोखरीच तपकीर ओढली.

"वा वा, Congratulations."

"ते कशाबद्दल ?"

"अरे तूं आता बदलणार-म्हणजे आमच्याप्रमाणे विचार-"

"तें राहूं दे रे. सांग ना, पहिली गाडी कोणती, तें."

"सांगूंच म्हणतोस ? आहे एक सकाळची रडत खडत जाणारी पॅसेंजर."

"मी मालगाडीनं देखील जायला तयार आहें."

"चूप-बिछान्यावर नीज अगोदर-ती येतेय ना. नीज."

तो चटकन निजला नि प्रेमा खोलींत आली.

"काय प्रेमाताई ? दूधबीध आणलं वाटतं ?"

"नाही रे. लक्षच नव्हतं-मघाशींच चुलीवर ओतूं गेलं."

"बरं, असूं दे. नाहीतरी त्याला आता झोप लागली आहेच."

  

सकाळीं पंचवीस हात सूर्य वर आल्यावर प्रेमा आळोखे पिळोखे देत जागी झाली तों तिच्या हाताला खालील पत्र लागलें.

"प्रेमाताई—रात्रीं तूं निजल्यावर श्रीची आई आजारी असल्याची एक्सप्रेस तार त्याला आली, म्हणून तो सकाळच्या गाडीने जात आहे. अशा स्थितींत त्याला एकटें पाठवणें बरें नाही म्हणून मीही बरोबर जात आहें. काल काम करून दमली असशील म्हणून जायच्या वेळीं तुला उठवणं आमच्या जिवावर आलं. बाकी जातांना तुझा निरोप घेतां आला नाही म्हणून श्रीला वाईट वाटत होतं. रागावूं नकोस हो गेल्याबद्दल. या घरांतल्या २४ तासांतल्या आठवणी तो मनांत घोळवीत असल्याचं दिसत आहे. ती. अण्णासाहेबांना त्याने प्रणाम सांगितले आहेत. अच्छा.

तुझा
विनूदादा"

—६—

स्टेशनवर येतांच विनायकाने अगोदर चहा टोस्टची व्यवस्था केली. खाणें पिणें झाल्यावर विनायकाने विचारले, "तुझं तिकीट कुठलं काढावयाचं रे बाबा?"

"तुला वाटेल तिथलं काढ."

"म्हणजे? तूं घरीं जाणार होतास ना?"

"जाईन सुट्टीचे शेवटचे तीनचार दिवस. सध्या तुझ्याबरोबरच राहणार."

"अरे, मी हा असा लहरी. घरीं बागायतीकडे निघालों तों हा इथच टपकलो. आता पुन्हा माझी लहर—"

"हें पहा जास्त वाद नको. तूर्त तुझ्याच लहरीवर मी नाचणार आहें."

"बरं—ठीक आहे." असें म्हणून तो गेला नी थोडया वेळाने त्याने तिकीट आणलें. तोंच गाडीही आली. दोघेही आंत चढले. श्रीनिवासने एक खिडकी गाठली. संध्याकाळीं ५॥ वाजतां "चला

उतरूं या" असें विनायक त्याला म्हणेतोंपर्यंत तो तेथून हलला नाही. आपण कोठे जात आहोंत याबद्दल टांग्यांतही त्याने विचारलें नाही. इतका तो स्वतांतच गुरफटला होता. टांगा उभा राहिला तो एका लहानशा बंगलीवजा घरासमोर. सामान घेऊन दोघे आंत आले. समोरच्या लहानशा दिवाणखान्यांत स्वच्छ प्रकाश होता. पण घर सामसूमच होतें. दोघेही मागच्या व्हरांड्यांत आले व समोरील दृश्य पाहून दोघेही एकदम थबकले.

सायंकाळच्या संधिप्रकाशांत तुळशीसमोर हात जोडून कालिंदी उभी होती. पांढरें स्वच्छ वृंदावन तुळशीने भरगच्च दिसत होतें. तुळशीसमोर निरांजन. त्याचा स्निग्ध प्रकाश भोवताली पडला होता. उदबत्तीच्या सुवासाने वातावरण भरून गेलें होतें. हात जोडून ती तुळशीसमोर तन्मयतेनें उभी होती. बिनकाठाचें पांढरें स्वच्छ पांचवारी पातळ ती नेसली होती. केसांचा सैलसा अंबाडा मानेवरून किंचित खाली पाठीवर आला होता. पदर गळ्यावरून डाव्या खांद्यावर पाठीकडे पसरला होता. त्याच्या शेपटाला लहानसा किल्ल्यांचा झुपका होता. त्या प्रशांत परंतु स्नेहपूर्ण वातावरणांतील गोड हुरहुर आपल्या अंतःकरणांत प्रवेश करते आहे असें श्रीनिवासला वाटूं लागलें. एरव्ही सदा मिस्किलपणे नाचणारे विनायकाचे डोळे समोरील दृश्यावर स्थिरावले. दोघेही स्तब्ध होते.

तिने तुळशीला प्रदक्षिणा घातली व एक नमस्कार करून ती मागे फिरली. "कोण ? दादा ? केव्हा आलास रे ?"

स्वागतार्थ ती एक दोन पावलें पुढे सरली. पण श्रीनिवासला पाहून एकदम थबकली.

"हा माझा मित्र श्रीनिवास. पुढच्या वर्षी एम्. ए.ला आहे. ही आमची कालिंदीअक्का बरं का."

तिने नमस्कार केला तेव्हा भानावर येऊन कुठे त्याने प्रति नमस्कार केला. तिचा सावळा वर्ण, विचारसामर्थ्य दर्शवणारें प्रशस्त कपाळ, गंभीर परंतु स्नेहस्निग्ध भावाने काठोकाठ भरलेले तिचे डोळे, शांत मुखमंडळाला नाजूक सौंदर्याने प्रसन्न करणारें, तिच्या ओठांच्या कोपऱ्यावर सतत खेळणारें मंद हास्य—वर्णाची रूपसंपदा नसली तरी प्रमाणबद्ध बांधा व ठायीं ठायीं प्रगट होणारें आत्मविश्वासयुक्त मार्दव इत्यादि गोष्टींनी श्रीनिवास नकळत भारला गेला. आपला अभिमान व चोखंदळ सौंदर्यदृष्टि, यांना आव्हान देणारें व्यक्तित्व एकाएकी आपल्यासमोर प्रगट झाल्यासारखें त्याला क्षणभर वाटलें.

" बरं झालं. यांना आणलंस तें," आपले डोळे श्रीनिवासवर रोखून ती हळूच म्हणाली, तेव्हा स्वागत करण्याच्या या अभिनव प्रकाराचे त्याने मनांत कौतुक केलें.

" चला आंत. अन् सामान कुठं आहे ? नेहमीप्रमाणं व्हरांड्यांत फेकलं असशील ?"

दोघेही हसले.

" चला दादांच्या खोलींत. " ती पुढे झाली.

" घरांत कोणीच कसं नाही ? " विनायकाने विचारलें.

" दादा गेलेत् ओरिएंटल कान्फरन्सकरतां नागपूरला. दिनू गेलाय एका मित्राकडे चार दिवस नी माणिकच्या Inter Collegiate Badminton मॅचेस निघाल्या आताच; म्हणून ती गेली आहे उमरावतीला. येतीलच ४।६ दिवसांत सर्व. तोंपर्यंत अस्मादिकांच्या तडाख्यांत आहेस तूं, समजलास ?" मंदहास्य करीत ती बोलत होती. वडिलांची खोली तिने उघडली. श्रीनिवास खुर्चीवर बसला, विनायक टेबलावरील पुस्तक चाळीत होता इतक्यांत तिने दोघांचेंहि सामान खोलींत आणून ठेवलें श्रीनिवास तिच्याकडे पहातच राहिला.

"तुझी सुरत पाहून दिवसभर आज प्रवास झालेला दिसतोय! कुठून आलांत?" तिनं चौकशी केली.

"सकाळींच प्रेमाताईचा निरोप घेऊन निघालों." उत्तर विनायकाने दिलें.

"अस्सं होय? थांबा हं!" असें म्हणून ती घाईने निघून गेली व दहा मिनिटांनी परत आली. "पाणी ठेवलंय तोंड धुवायला अंगणांत" एवढें एकच वाक्य ऐकवून ती परत फिरली. दोघे हात पाय तोंड मनमुराद धुवून परत येतात तों खालच्या सतरंजीवर वाफ निघत असलेले कॉफीचे कप ट्रेमध्ये व शेजारीं कालिंदी! श्रमपरिहार झाल्यासारखें श्रीनिवासला वाटलें. कप हातीं घेऊन तो ओठाने हळूहळू कॉफी चाखूं लागला, तर बशींत ओतून विनायकाने तिला गटागट घशाखाली ओतायला प्रारंभ केला.

"हे रे काय पिणं तुझं? जरा Philosophic mind नी enjoy करून पी की!"

आपल्याकरतांच हा हळुवार फटकारा आहे या संशयाने श्रीनिवासने कपाच्या काठावरून हळूच नजर वर केली. तों प्रेमळ उतावीळपणाने विनायकाचा कप पुन्हा भरीत असलेली "त्याची अक्का" त्याला दिसली. स्त्रीस्वभावांतील ही गुंतागुंत प्रथमच त्याच्या नजरेला आली. त्याने नजर फिरविली तों कालिंदी एकाएकी अदृश्य झालेली..

"लहान न्हाणीघरांत तुझ्याकरतां, नी मोठ्यांत यांच्याकरतां ऊन पाणी ठेवलं आहे. स्नान केलं की अम्मळ बरं वाटेल." पांच मिनिटांनी प्रगट होऊन ती हसत म्हणाली व अर्धाअधिक रिकामा झालेला श्रीनिवासचा कप त्याच्या हो नाही म्हणण्याची वाट न पाहतां तिने सहजासहजी भरून टाकला. मागे वळून तिने त्यांचे होल्डऑल उघडले. आंतून धोतर रुमाल काढून पुनः नीट गुंडाळून